# कुंवारपणीं ! !

[ गद्यपद्यात्मक, तीन अंकी, सामाजिक नाटिका ]

: लेखक :

पुरुषोत्तम नीलकंठ ऊर्फ अप्पा साठे

चिपळुण

— प्रकाशक —

बलवन्त पुस्तक भाण्डार,

गिरगांव नाका, मुंबई नं. ४.



बलवन्त

प्रकाशन

गिरगांव मुंबई

क्रमांक ३९

प्रथमावृत्ति

ऑगस्ट १९५४

किंमत १२ आणे

ज्यांनीं ज्यांनीं ही नाटिका रंगभूमीवर
यावी म्हणून अत्यंत आपुलकीनें
परिश्रम घेतले त्या सर्वांस
हें नाट्यपुष्प अर्पण
करीत आहें.

—नाटककार

# ओळख

श्री. अप्पासाहेब साठे यांची गेल्याच वर्षी चिपळुण येथें ओळख झाली. त्या वेळीं एका इंग्रजी नाटिकेच्या आधारें लिहिलेली 'विठोबाची चोरी' ही आपली नाटिका त्यांनीं मला वाचावयास दिली. याच इंग्रजी नाटिकेच्या आधारें प्रा. ना. सी. फडके, कवि कुसुमाग्रज, यांच्यासारख्या प्रतिथयश लेखकांनींहि नाटिका लिहिल्या आहेत. त्या चांगल्या आहेत; पण अप्पासाहेब साठे यांनीं संत दामाजीला नायक करून महाराष्ट्रीय मनाची एकदम पकड घेईल असें वातावरण निर्माण करण्यांत मोठेंच चातुर्य दाखविलें आहे. ही नाटिका त्यांनीं मला वाचावयास दिली तेव्हांच एकदोन मोठ्या नाटकांचीं हस्तलिखितें त्यांच्याजवळ तयार असल्याचें त्यांनीं मला सांगितलें होतें. त्यांपैकीं 'कुंवारपणीं' हें नाटक आतां छापून प्रसिद्ध होत आहे आणि रंगभूमीवरहि येत आहे ही खरोखरच आनंदाची गोष्ट आहे. हें नाटकहि वीसबावीस वर्षांपूर्वी लेखकानें लिहिलेलें आहे. त्या वेळीं संततिनियमनाची चळवळ नवीन होती आणि जनतेलाहि तिच्याबद्दल कुतूहल होतें; पण या नाटकांतला मध्यवर्ती प्रश्न अमुक चळवळ वाईट कीं चांगली हा नसावा असें मला वाटतें. एखाद्या चांगल्या सामाजिक चळवळीचाहि समाजांतले वाईट लोक कसा दुरुपयोग करतात हेंच लेखकाला दाखवावयाचें आहे हें उघड आहे. लेखकाचा हा उद्देश सफल झाला आहे यांत शंका नाहीं.

मुंबई
२१–८–५४

अनंत काणेकर

'कुंवारपणीं' या नाटकाचा 'संयुक्त प्रयोग' शनिवार दिनांक २८ ऑगस्ट रोजीं रात्रौ ८–३० वाजतां 'दामोदर हॉल, परळ' येथें ज्या नटवर्गानें करून दाखविला त्यांचा परिचय.

**डॉ. पद्माकर** : मा. दामले, (नूतन पेंढारकर)

**डॉ. पंढरी** : मा. दत्ताराम

**रवींद्र** : श्री. भालचंद्र साठे

**नागेश** : श्री. वासुदेवराव थत्ते

**सखाराम** : श्री. वसंतराव काळसेकर

**पद्मा** : कु. विमल फडके

**सुंदर** : कु. जयश्री शेजवाडकर

**अरुणा** : सौ. सुशिलाबाई शेजवाडकर

**सखू** : कु. शरयू भोपटकर, M. A.

शिवाय हरिभाऊ जोशी, नरहर बापट वगैरे

चिटणीस
**गजाननराव मराठे**

व्यवस्थापक
**व्ही. आर्. सावंत**

स्टेज मॅनेजर : **शिवकुमार जोशी**

# निवेदन

सुमारें वीस वर्षांपूर्वी, माझे स्नेही कै. विनायकराव बर्वे (कवि आनंद) यांच्या प्रेरणेनें मीं लेखणी हातांत धरली. त्याच सुमारास चिपळूण येथें समर्थ नाटक मंडळी आली होती. त्यावेळीं कै. विष्णुपंत औंधकर यांनीं हें नाटक वाचून पसंत केलें होतें. नाटकाचें नांव 'कुंवारपणीं' हें त्यांनींच सुचविलें आहे; त्यांच्याच कंपनीतर्फे हें नाटक रंगभूमीवर यावयाचें—परंतु कंपनीच्या तत्कालीन बिकट परिस्थितीमुळें तो योग आला नाहीं. आज इतक्या वर्षांनीं मा. दत्ताराम व श्री. दामले (नूतन पेंढारकर) यांच्यासारख्या नामवंत नटवर्गानें या नाटकाचा प्रयोग यशस्वी रीत्या रंगभूमीवर करण्याचा उत्साह दाखवला; म्हणूनच केवळ हें नाटक आज प्रकाशांत येत आहे.

वीस वर्षांपूर्वी लिहिलेल्या या नाटकाला रंगभूमीवर येण्यापूर्वी अद्यावत् स्वरूप आणणें अपरिहार्य होतें. तें काम माझ्या अनुपस्थितींत कै. कवि आनंद यांची भगिनी चि. सौ. मालती जोशी हिनें अत्यंत आपुलकीनें केलें; हाहि एक मी सुयोगच समजतों.

माझ्यासारख्या अप्रसिद्ध माणसाची 'ओळख' श्री. अनंत काणेकर यांनीं करून दिली, याबद्दल त्यांचे आभार मानण्यास माझ्याजवळ शब्द अपुरे आहेत.

सदर पुस्तक अल्पावधींत सुबक तऱ्हेनें छापून दिल्याबद्दल रामकृष्ण प्रिंटिंग प्रेसचे मालक श्री. बाबूराव सापळे, मुद्रण खात्याचे व्यवस्थापक श्री. बाळ वेतकर, पुस्तक प्रकाशन केल्याबद्दल 'बलवन्त पुस्तक-भाण्डार'चे मालक श्री. अण्णा परचुरे यांचा मी अत्यंत आभारी आहें.

नाटकाच्या प्रथम प्रयोगाकरितां सुरवातीपासून शेवटपर्यंत प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीनें ज्यांनीं साह्य केलें त्यांचाहि मी आभारी आहें. त्याचप्रमाणें मुखपृष्ठावरील फोटो काढून त्याचा सुबक ब्लॉक करून दिल्याबद्दल सेगन् फोटो स्टुडिओचे मालक व ब्लॉकमेकर श्री. गुप्ता यांचाहि मी आभारी आहें.

चिपळुण
ता. २२-४-५४ }

पु. नी. साठे



# – विठोबाची चोरी –

'Bishop's Candlesticks'चे आधारें

## एकांकिका

लेखक : पु. नी. साठे, वकील, चिपळुण



चंद्रोदय प्रकाशन, चिपळुण

किंमत ६ आणे



बलवन्त पुस्तक–भाण्डार,
गिरगांव, मुंबई ४



# कुंवारपणीं ! !

## अंक १ ला



### प्रवेश १ ला

[ **स्थळ** : पुणें, रवींद्र वकीलाचें घर. वकीलाचे ऑफिसला लागणारें जरूर तें फर्निचर. वेळ सायंकाळीं ४ वाजण्याची. रवींद्राचा गडी सखाराम सामानसुमान, पुस्तकें वगैरे नीट लावून ठेवीत असतो. काठीला बांधलेल्या फडक्यानें, पुस्तकें, टेबल वगैरे झाडतो. पुस्तकें लावीत असतां—

**सखाराम** : हां काय वकीलाचां हपीस का वाण्याचां दुकान ? रुबाब समदां हवा पर येवस्था ठेवाया नुको. हां, बुका ठेवायां कपाट आणलानी, पर त्यांत बुकां ठेवतोय् कोन, अन् वाचतोय् तरी कोन ? समदीं बुकां तर तो नागु वकील घेऊनशान जातो. हवां लागलां कीं सखाराम धांवतोय् नागु वकीलाकडे. (त्रासून) एक वस्तु नाय कधीं जथल्या थतं ठेवायचे.

[ रागारागानें पुस्तकें, वर्तमानपत्रें, कागद आपटतो. फडक्यानें झाडतांना कागद, वर्तमानपत्रें खालीं पाडतो. इतक्यांत रवींद्र वकील येतो व कपडे काढूं लागतो.

**रवींद्र** : अरे, हें काय झाडणें कीं काय? दिवसभर काय करीत होतास ? बरं, जा आधीं चहा ठेवायला सांग आणि टपाल व पेपर घेऊन ये. ( सखाराम जातो) ( खालीं पडलेले कागद, वर्तमानपत्रें उचलून टेबलावर ठेवतो. त्यांत सुंदरचा फोटो सांपडतो, तो पाहून ) अरे हें काय ? सुंदरताईचा फोटो? गेले सहा महिने दृष्टिआड केलेला हा फोटो आज असा पायदळीं पडला ! सुंदर, तुलासुद्धां अशीच कुणीतरी पायदळीं तुडवली असेल का ! ताई, माझ्या क्षमाशील वृत्तीवर अविश्वास दाखवून तूं मला दुरावलीस,—म्हणून तुझी आठवण दूर करण्यासाठीं

तुझा हा फोटो मीं दृष्टिआड केला होता. पण आज तो अशा रीतीनें माझ्या दृष्टीसमोर येण्यानं, पुन्हां तुझ्या शोधाची आशा......( सुस्कारा टाकून ) पण—छेः ! मानवी आशा सफल करण्यापेक्षां त्या फोल ठरविण्याचाच दैवाचा दुर्लौकिक आहे. ( सखाराम–टपाल, पेपर घेऊन येतो, त्यांतून एक पत्र घेऊन वाचतो ) अरे वाः ! आमच्या राणीसाहेबांच्या भगिनींना, इंदुताईना, पुत्रलाभ झाला. अरे ए सखाराम, जा, हें पत्र नेऊन दे आधीं तिला ! बाकी भाच्याच्या जन्मानंदानें स्वतःची पुत्रलाभाची इच्छा वाढायची; नकोरे बुवा तीं पोरं ! ( खुर्चीवर बसून वर्तमानपत्र उघडतो. इतक्यांत नागेश व पंढरी येतात. ) या—या, बसा, अरे सखाराम, ए सखाराम, ( सखाराम येतो ) हें बघ, चहा आणखीं दोन कप करायला सांग.

**नागेश** : ( खुर्चीवर बसत ) कांहीं खायला असेल तर आण बुवा. चहा आतांच घरीं घेतला. हें बघ, कांहींतरी तिखट करायला सांग.

**सखाराम** : ( स्वगत ) कवाबी बघा तिखट खाया हवां. सबावांतच गोडवा नाय. त गोड खातो तरी कुटनं ?

**नागेश** : अरे सखाराम, आधीं ते कार्ड्स आण पाहूं ?

**सखाराम** कारडॉ ! म्हंजी काय ?

**नागेश** : अरे, म्हणजे खेळायचे पत्ते, ( स्टॅन्डवरील पत्ते घेऊन ते पिसत. ) बरं जा; अर्धवट कुठला.

[ जातो.

**रवींद्र** : डॉक्टर, पद्माकर कसा नाहीं आला बोवा अजून ?

**नागेश** : असेल दवाखान्यांत ! हल्लीं त्याला दुसरे दोस्त भेटले आहेत ना ?

**रवींद्र** : मग ! त्यांत काय झालं ? तुला नाहींत का हे दुसरे दोस्त भेटले ? ( पंढरीस ) काय Dentist, आपण कुणीकडे आज झुकलांत !

**पंढरी** : तसं नाहीं कांहीं ! आलों झालं.

**नागेश** : त्यांचा अर्ज आहे ! आमच्या कंपनींत घ्या म्हणतात सामील करून.

**रवींद्र** : सामील करून ! आणि आमच्या कंपनींत ! आम्हीं नाहीं बोवा कंपनी काढली....

**पंढरी** : नाहीं, नाहीं—तसं नाहीं कांहीं ! म्हणजे—म्हटलं तुमच्यांत घ्या आपलं.

**रवींद्र** : तुम्ही बोवा बडे बापके बेटे! आमच्यांत कसले तुम्ही येतां! तरी पण पद्माकर आल्यावर करा त्याच्याजवळ विनवणी. येईलच तो इतक्यांत.

**नागेश** : तो कसला येतो इतक्यांत? आज तो आणि त्याचा मित्र प्रभाकर, शिशुसप्ताहाला जायचे होते. हल्लीं त्यांचें सोन्याहून पिवळें असें मेतकूट जमलें आहे. आतां ते समाजसेवा करायला निघाले आहेत. शिशुसंगोपन करून काय भिकाऱ्यांत भर टाकायची आहे कीं काय कोण जाणें. विधवेला कुंकवाची उठाठेव–त्याचप्रमाणें अविवाहितांना अर्भकांची काळजी!

[ डॉ. पद्माकर येतो.

**पद्माकर** : अरे माझ्यासारख्या अविवाहित समाजसेवकांनीं जर अर्भकांची काळजी घेतली नसती तर तुमच्यासारखे वीर अर्भकांच्या जिवावर उठायला जिवंतच राहिले नसते.

**रवींद्र** : मग काय—पूर्वींचे समाजसेवक जसे वागले तसे आम्हींहि वागावें म्हणतोस?

**पद्माकर** : तसं कोण म्हणतो? खुशाल मठांत जाऊन मुंडण करावं व झालेल्या अर्भकांचा भार जगावर टाकावा.

**नागेश** : पण पोरं भीक मागण्यापेक्षां तीं न होतील असं केलं म्हणून काय हरकत?

**पद्माकर** : ही आपली Birth Control ची थिअरी आली वाटतं. खरंच आहे, तुमच्यासारख्या अविवाहितानें मासिकें काढून संततिनियमनाचा उपदेश करायचा नाहीं तर कुणीं करायचा? एरवीं व्यभिचार वाढणार कसा आणि स्वैर-प्रेमाचे फवारे उडणार कसे?

**रवींद्र** : कां बरं? खरं प्रेम असेल तिथं प्रतारणा होणारच नाहीं.

**पद्माकर** : पण स्वैर कल्पनातरंगांतील खरं प्रेम–काल्पनिक नाटकें, कादंबऱ्यां–शिवाय या सत्यसृष्टींत कितीसें दिसतें? प्रेमाच्या प्रथम दर्शनींच आत्मसंयमन अशक्य होऊन अविवाहित तरुण अविचारानें कुमारिकांना कुमार्गाला लावतात आणि मग अपत्यजन्माच्या जाणिवेनं भेदरून जाऊन जबाबदारी टाळण्याकरितां त्याच्याकडे पाठ फिरवून पुन्हां सन्माननीय समाजसेवक म्हणून मिरवतात. प्रत्यक्ष डोळ्यांसमोर असले पापी पुण्यात्मे रोज दिसत असतांना, खऱ्या प्रेमाच्या गप्पांवर विश्वास कोण ठेवणार?

[ सखाराम–चहा आणतो. ]

**रवींद्र :** बरं, राहूंदे तो विषय. चहा घ्या आधीं. काय रे सखाराम, खायला नाहीं का ? ( मानेनें नाहीं म्हणतो ) बरं, उद्यां करून ठेवा म्हणावं. ( चहा पीत असतांना नागेशला ठसका लागतो...खोकून–खोकून घाबरा होतो ) अरे, अरे, वर आढ्याकडे बघ !

**प्रभाकर :** काय समाजसेवक, आपलेंच बिंग बाहेर फुटल्यागत घाबरेघुबरे काय झालांत ?

**रवींद्र :** ठसका लागलाय् रे त्याला ! राहूंदे तो विषय. ( पंढरीस ) हं ! काय डॉ. पंढरीनाथ, लोकांचे दांत पाडण्याचें कार्य कसं काय चाललंय् तुमचं ?

**पंढरी :** तसं नाहीं कांहीं ! प्रथम जरा बरं होतं . अजून तो डिप्लोमा मिळाला नाहीं ना ! काय सांगूं हो, अेम्. बी. बी. अेस्. च झालों असतों. पण तीं प्रेतं पाहायचीच भीति वाटते, मग तीं फाडतां कुठलीं ? प्रेतं फाडायची पाळी आली तसा पळच काढला ! त्यापेक्षां हे दांत पाडणं सोपं ? पण हल्लीं पेशंटसूच नाहींत. अगदीं एकटं बसायच म्हणून इकडे आलों.

**रवींद्र :** मग दुकटे व्हाना ! अरे पद्माकर, कॉलेजमध्यें तुमची आणि यांची म्हणे कॉंपिटिशन् होती ? पण काय रे नागेश, पद्माचा ओढा कुणाकडे आहे. ? खरंच, आतां यायची असेल नाहीं का ? परीक्षा आटपली का ?

**नागेश :** हो, आज–उद्यां येईलच.

**रवींद्र :** हं ! [ सुस्कारा टाकतो.

**पद्माकर :** कां रे रवींद्र ! एकदम असा खिन्न कां झालास ? पद्माबरोबर सुंदर नाहीं येणार, म्हणूनच ना ?

**नागेश :** रवींद्र, माझी पद्माताई, तीच तुझी सुंदर असं समज ! पहा पद्माकर, अशा गोष्टी होऊं नयेत म्हणूनच मी संततिनियमनाचा आग्रह धरतों.

**पद्माकर :** म्हणजे स्वैर प्रेम पागळायला लावून व्यभिचाराला मदत करतोस.

**नागेश :** असं मुळींच नाहीं. माझीं तत्त्वें कुमारिका, विवाहित आणि विधवा सगळ्यांना सारखींच लागू पडतात. मग ती सुंदर असो, पद्मा असो किंवा कोणीहि असो. इतकेंच काय पण रवींद्र आणि वहिनी यांच्या बाबतींतसुद्धां मी तेंच म्हणेन.

**पद्माकर** : नागेश, पुरे झालं बाबा तुझं तत्त्वज्ञान. फार वाहवलास. तुझीं तत्त्वें अलिकडे फार ढिलीं झालेलीं दिसतात. असलीं तत्त्वें ऐकवण्यापेक्षां तूं गप्प बसलास तर अधिक आवडेल आम्हांला !

**रवींद्र** : राहूं दे रे तें. तुम्ही नेहमींच एकेरीवर येतां !

**नागेश** : जातोंच आम्ही मुळीं. चला पंढरीनाथ, चला, बाजारातूंनच जाऊं.

**रवींद्र** : बरं आहे डॉक्टर, येत चला कधीं कधीं ! [ पंढरी, नागेश जातात. ] पद्माकर, तूं अलिकडे नागेशला फार बोलतोस !

**पद्माकर** : मला आंत एक आणि बाहेर एक—करतांच येत नाहीं. हे लोक प्रेमाचा खेळ खेळणं आणि पत्त्यांचा डाव खेळणं सारखंच समजतात. ( खिशांतलें एक चिटुरकें काढून दाखवत ) बरं, हें पाहिलंस एका मासिकांतलं काव्य—आवडलं म्हणून कात्रण काढून ठेवलं.

**रवींद्र** : तूं—डॉक्टर—आणि काव्य वाचतोस ? बाकी तेंहि बरोबर ! मनुष्य प्रेमांत सांपडलेला असला कीं त्याचें काव्यप्रेम पण दुथडी वाहूं लागतें. बघूं—नको, नको, तूंच दाखव म्हणून—आवडलेली कविता गुणगुणत असशीलच—हं म्हण बघूं—

**पद्माकर** : म्हणतोच तर—

**पद** : केदार–जलद एक्का

**नव नितांत शांत प्रेम**
**खेळ नसे तत्त्व असे**
**जें मंगल प्रेम धाम ॥ ध्रु० ॥**
**मूढ ! लोक मानितात**
**प्रेमभाव, देहजात**
**व्यापितसे जें जीवन**
**या तरुणा सम–क्रीडन ॥**

**रवींद्र** : ( गाणें संपल्यावर टाळ्या वाजवून ) वाहवा–वाहवा ! काव्यहि छान आहे आणि म्हटलंस पण चांगलं.

**पद्माकर** : कसचं–कसचं ! बरं, रवींद्र, मी आतां दवाखान्यांत जातों. ( रिस्ट-वॉचकडे बघून ) उशीर झाला.

[ पद्माकर गेल्यावर रवींद्र वर्तमानपत्र वाचीत बसतो. सिगारेट पेटवितो. अरुणा हातांत एक पत्र घेऊन वाचीत येते.

**अरुणा :** ( स्वगत ) अपत्यजन्माचा आनंद किती बरें असेल! माझ्या इंदुताईला मुलगा झाल्याचें वाचून जर मला इतका आनंद होत आहे तर, मलाच-खरंच, अलिकडे माझ्या संसारांत ज्याची मला उणीव भासत आहे त्याची जाणीव या पत्रानें करून दिली. पतिपत्नींच्या प्रेमाचें मूर्तस्वरूप, पतीपत्नीच्या विवाहशृंखला चिरकाल अभंग ठेवणारा मधला अखंड दुवा—म्हणजेच पतीपत्नीच्या प्रेमपूर्तीचें अपत्यरूप प्रतीक. अपत्यलालसेच्या नुसत्या जाणिवेनें माझं हृदय हालूं लागलें तर प्रत्यक्ष अपत्यजन्मानें माझ्या हृदयांतून दुग्धाम्मृताचे पाझर वाहूं लागतील यांत नवल काय?

**रवींद्र :** कसलं चिंतन चाललं आहे! मघांपासून पाहतों आहें, तूं त्या पत्रांत दडी मारली आहेस! बाहेरच्या जगाची जाणीवसुद्धां विसरण्यासारखं त्यांत आहे तरी काय?

**अरुणा :** जसं काय माहितच नाहीं! पत्र फोडलेलं तर होतं!

**रवींद्र :** नाहीं बुवा, तुमचं पत्र पाहिलं, म्हणून आपण कांहीं वाचलं नाहीं!

**अरुणा :** खरंच! मग थट्टा करायची नसेल तर सांगतें!

**रवींद्र :** थट्टेचा विषय असेल, तर कुणीहि थट्टा करील! थट्टेच्या विषयाला गंभीर स्वरूप देऊन, क्षणभराचा आनंद गमावण्याइतका कांहीं मी अरसिक नाहीं खास!

**अरुणा :** तर मग मी मुळीं सांगतच नाहीं!

**रवींद्र :** सांगत नाहीं! बरं बोवा, थट्टा सोडून दिली. आतां एखाद्या राजकारणी मुत्सद्यासारखा, आपल्या तोंडून बाहेर पडणाऱ्या पत्रांतील राजकारणाचें मर्म समजावून घेण्याकरितां, हातांतल्या सिगारेटच्या धुराकडे पहात बसतों!

**अरुणा :** हें काय बरं? आपल्याला मुळीं थट्टेशिवाय सुचतच नाहीं कांहीं. बाबांचं पत्र आहे हो! आमच्या इंदुताईला किनई मुलगा झाला!

**रवींद्र :** होय का! मग पेढे वांटा! दुसऱ्याच्या मुलांचे पेढे खायला आमची तयारी आहे. पण—दुसऱ्यांना पेढे द्यायला मात्र इतक्यांत, मेहेरबानीनें घाई करूं नका! दुसरे लोक पेढे खातील आणि पोरांच्या खर्चात आमचा चहा, चिवडा, सिगारेट मात्र बंद व्हायचा! नको रे बुवा तीं पोरं! आजकाल पैसा

मिळणं मुष्कीलच आणि त्यांत पक्षकारांऐवजीं पोरांचें लेंढार मात्र मागं लागायचं!

**अरुणा :** असं बोलवतं तरी कसं! सुख पाहिजे, पण जबाबदारी नको! नागेश-भावजींचीं मतं पाठ झालेलीं दिसतात! खरंच आहे! स्त्रीखेरीज मातृहृदय असणार कोणाला आणि कळणार तरी कोणाला? आज जर सासूबाई असत्या तर याचं उत्तर त्याच देत्या. (टेबलावरील सुंदरचा फोटो पाहून) अगबाई, हा फोटो कुणाचा? वन्संचा. खरंच, वन्संचा कांहीं पत्ता आहे का? (रवींद्र मानेनें, 'नाहीं' म्हणतो.) कुठं बरं असतील त्या? देवा, काय त्यांच्यावर प्रसंग असेल! खरंच, पद्मानं लिहिलं होतं तें खरं का! हीं तुमचीं पुरुषी मतें माहीत, म्हणूनच त्या बिचाऱ्या पोटांतल्या बाळासकट कुठं तरी–नकोच मेला तो विचार. सासुबाई असत्या तर असं कशाला झालं असतं!

**रवींद्र :** बरं, तें राहूंदे! सिनेमाला जाऊं चल! जा पाहूं कपडे कर. (जाते) आई, खरंच आज तूं जिवंत नाहींस हेंच बरें आहे! नाहींतर तुझ्या प्रेमाची अपत्यमूर्ती सुंदरच्या रूपानें भंग झालेली पाहाण्याचं तुझ्या नशिबीं आलें असतें!

[ तारवाला तार घेऊन येतो.

**तारवाला :** मिस्टर रवींद्र गायतोंडे! तार आहे साहेब!

[ तार देतो व निघून जातो.

**रवींद्र :** (तार फोडून वाचतो) काय! Sunder dangerously ill Start with Padmakar–Padma. पद्माची तार! सुंदर जिवंत आणि मुंबईत! कॉलेजमधून नाहींशी झाल्यावर आज सहा महिन्यांनीं सुंदरची हकीगत समजते आहे, आणि तीसुद्धां या रूपानें! सुंदर, आईच्या आणि बाबांच्या मागें अपत्यप्रेमानें तुझं संगोपन केलं त्याचा मोबदला, या रवींद्राचें हृदय त्या अपत्यप्रेमाला पारखें करून दिलास. पण–विचार करायला वेळच नाहीं. सखाराम–ए सखाराम, (अरुणा येते, मागाहून सखाराम येतो) हें पहा, मला मुंबईला आतांच गेलं पाहिजे. निकडीची तार आहे; आणि हें बघ, सखाराम–(चिठी खरडतो) तूं ही चिठी डॉक्टर पद्माकरला नेऊन दे! जा, पळ. हें बघ, सायकलवरूनच जा. (जातो)

**अरुणा :** पण एवढं आहे तरी काय? कुणाची तार आहे?

**रवींद्र :** तें मग सांगेन आल्यावर सगळं. कपडे करून, तावडतोब बाहेर पडलंच पाहिजे मला! पांचची Express गांठायची आहे. (जातो)

**अरुणा :** कुठंहि पहा, पत्नीनें पतीपासून कांहींसुद्धां गुप्त ठेवतां कामा नये; उलट पतीनें मात्र पत्नीपासून कांहींहि गोष्टी चोरून ठेवल्या तरी चालतं ! असंतोषाचा उगम अविश्वासांत होतो तो हा असा !

**पद :** राग–मांड मिश्र, ताल–केरवा

**जिथें विश्वास, प्रेम तिथें माना ॥ धृ० ॥**
**संतोषांतुनि सुखरती वितरत**
**असुख कदापिच ना ॥ १ ॥**
**पतिपत्नी जगीं अद्वैतासम**
**विषमता दिसोना ॥ २ ॥**

---

## प्रवेश २ रा

[ **स्थळ :** नागेशाच्या घरासमोरील रस्ता. सखाराम हातांत चिठ्ठी घेऊन येतो.

**सखाराम :** साहेबाला एक तार आली पर या धावपळींत माझ्या समद्या तारा तुटायला झाल्या ! पद्माकर डाक्टरकडं पळ, सामान बांध, टांगा आण, ठेसनावर चल–एक ना दोन ! समदं झालं तरी शेवट ठेसनावरच त्या नागु वकीलाला द्याया चिठ्ठी दिल्नी. पर तां बेस ! सखू तरी भेटल. हा नागु वकील तरी मंमईस जाता–तर सखूचा समदा सुख तरी लुटाया मिलालं असतां. या नागु वकीलाची काय भानगड हाय ? एकटा जीव घरामधीं राहातो तरी कसा ? सखू-सारी फाकडू मोलकरीण आणि हा एकटा. ( इतक्यांत सखू बाहेरील बाजूस केराचा खोका घेऊन केर टाकायला येते. येतांना सखारामला धक्का लागतो. ) अग पर, हो, हो ! वाटंत माणसा हाईत–कचरा न्हाई.

**सखू :** माणसा हाईत तर बाजूस व्हावा; वाटंत कशापायीं उभें !

**सखाराम :** तुझं त्वांड बगाया. वकलिाचं घर नी चव्हाटा—चव्हाट्यावरचीं समदी स्वांगं वकीलाच्या अन् डाक्टरच्या घरांत दिसायचीं.

**सखू :** म्हणूनच तुझं स्वांग हतं उभं हाय व्हय ? तुमच्या वकीलाच्या दारांत आज स्वांगं न्हाईत व्हय् !

**सखाराम** : न्हाईना ! म्हणून तर हत आलों : आमचे वकील गेले ममईला आज !

**सखू** : खरंच, मना बी एकदा मंमईला जायचं हाय !

**सखाराम** : मंग माझ्यासंग म्होतूर लाव. म्हंजी दोघं बी मंमईला जाऊन जिवाची मंमअी करूं आणि पोराबाळांत संसार करूं !

**सखू** : नको ग बया तीं पोरं ! अन् तुमच्यासंगं म्होतुर लावून पोराबाळा-सकट भीक मागायची हाय व्हय ? चार वर्षा वकीलाची चाकरी केलीत पर चार रुपयांचा लुगडा बीं न्हाइ दिलांत. न्हाईतर माझ्या मालकानं बघा— चार वर्षांत चार लुगडी आनी चौदा पातला नेसवलान मला. पर तुम्ही कुठलं नेसवाया ?

**सखाराम** : पर माझ्याकरसून तूं नेसवून घेशील तवा ना ? तुझा वकील तरी आज मंमईस जाता—

[ लगट करतो. इतक्यांत नागेश व पंढरी येतात.

**नागेश** : काय रे करतां इथं ? कोण मुंबईला जातंय सखाराम ? काय ग सखू ? पद्मा आली का ?

**सखू** : न्हाई बा आल्या. ( जाते )

**नागेश** : कां बरं नाहीं आली ! Never mind, Doctor ! Don't be disappointed ! येईल आज उद्यां. अहो विरहानेंच प्रेम वाढतं !

**पंढरी** : नाहीं, तसं नाहीं कांहीं. पण—म्हटलं बरेच दिवसांत भेटली नाहीं !

**नागेश** : अरे भेटेल ! मी तुमची दोघांची कायमचीच गांठ घालून देतों ना ? बरं, काय डॉक्टर चहा घेणार ना !—काय रे सखाराम, तूं कां उभा ?

**सखाराम** : हें साहेबाचं पतर हाय. ( पत्र देतो ) मंमईला गेलेत ! दोन दिस् काम बगाया सांगितलां हाय कोडतांतलं !

**नागेश** : ( पत्र वाचून ) काय ? सुंदर आजारी म्हणून पद्माची तार ! हें काय लचांड आहे ! बरें, सखाराम, तूं जा. ( सखाराम जातो ) पद्माकराला घेऊन गेला काय ? अस्सं !

**पंढरी** : काय भानगड आहे हो ! सुंदर सांपडली वाटतं ! कॉलेजमधून नाहींशी झाल्यापासून होती कुठं ?

**नागेश** : रवींद्र परत आला म्हणजे समजेल सगळं. पद्माकरसुद्धां गेला आहे.

पाहिलंत ना, अलिकडे आमच्यापेक्षां पद्माकर जवळचा झाला आहे. बरं डॉक्टर, बाय् बाय् ! उद्यां भेटूंच !

**पंढरी** : बरं, बाय् बाय्. पण हें पहा, आम्हांला फार दिवस लोंबकाळून ठेवूं नका मात्र ! जातों मी.

[ जातो.

**नागेश** : खरंच, ही काय भानगड झाली ? सुंदर आणि जिवंत ? त्या मूर्ख पोरीनं माझं नांव घेतलं म्हणजे जगांतून नांवासकट नाहींसा होण्याची वेळ यायची. सुंदरच्या भानगडीमुळें संततिनियमनाची सोईस्कर थिएरी काढावी लागली. पण छेः ! सुंदर बोलणंच शक्य नाहीं ! बाकी, बायका इतक्या उघड्या झाल्या म्हणजे त्या बायका कसल्या ? पण तो पद्माकर ज्या अर्थी गेला आहे. तेव्हां कांहींतरी किटाळ उत्पन्न करायचा ! काय बरं करावं ! (विचार करून) पंढरीला त्याच्यामागें पाठवावा; पद्माच्या भेटीच्या आशेवर हा वेडा धांवत जाईल आणि आपल्यालाहि काय भानगड आहे तें कळेल. तारच करायला सांगतों म्हणजे सावध रहायला बरें. रवींद्राला जर समजलें तर–रवींद्राची आठवण झाली कीं अरुणेचा मोहक चेहरा डोळ्यासमोर दिसूं लागतो. छेः मी फारच वाहावलों. मित्राशीं प्रतारणा–पण सुंदरला फसवल्यावर आतां आणखी प्रतारणा ती काय राहिली ? दारूच्या एकच प्याल्याप्रमाणें वैषयिक प्रेमाचा एकच घुटका शरीराबरोबर मनालाहि विषयी करतो हेंच खरं ! या मातीमोल झालेल्या मनाला कितीहि आंवर घालण्याचा यत्न केला तरी सुंदरच्या मागें अरुणेचा सुंदर चेहेरा–( मनाला आवर घालण्याचा प्रयत्न करतो ) अरे, पण विचारांच्या भरांत, वेड्यासारखा, मी रस्त्यावरच काय उभा राहिलों ! प्रथम ताबडतोब पंढरीला रवाना करावा.

---

## प्रवेश ३ रा

[ **स्थळ** : मुंबई, पद्माची खोली.

**सुंदर** :
**प्रेम मंदिरा तडा लागला**
**नुरला प्रेमाधार**
**माझें जीवन होय असार ॥ धृ० ॥**

**समाज देइल केवळ दूषण**
**नको नको तें जगणें भीषण**
**कुठें राहिलें माझें मींपण**
**कशास माझा भार। माझें जीवन होय असार ॥**

[ पद संपल्यावर सुंदर कॉट्‌वर बसते. पद्मा औषध घेऊन येते व ग्लास-मध्यें ओतूं लागते.

**सुंदर** : कशाला जगवतेस मला? फसव्या प्रेमाच्या या अंकुराची चाहूल लागतांच आत्महत्त्या करायला निघालें—पण त्यापासून त्या माऊलीनें वांचविलें, आणि प्रसूतिच्या वेळीं मेलें असतें तर तूं मरूं दिलें नाहींस! जग मानानें जगूं देणार नाहीं म्हणून मृत्यूचा आश्रय घेऊं लागलें तर तोहि आधार दिलात नाहीं तुम्ही!

**पद्मा** : चल्! हा डोस घे पाहूं! आ ऽऽ कर. ( तोंडांत डोस ओतते ) तुला आतां मरण्याचा अधिकार नाहीं. सुंदर, तूं आई आहेस. ( कॉटवरील बाळाकडे बोट दाखवून ) या अंकुराला वाढवणें हें एकमेव कर्तव्य तुझं! तेंच तुझं जीवितध्येय नि तोंच तुझा आनंद.

**सुंदर** : त्याच्या जन्मानेंच मी पापी ठरलें आहें जगाच्या दृष्टींनं!

**पद्मा** : त्यांत त्याचा काय दोष? भूमीवर पडलेलें प्रत्येक बीज मृगाचा पाऊस प्याल्याबरोबर अंकुरित होतं—म्हणून निसर्ग कांहीं त्यांच्या संगोपनाबद्दल शंका कुशंका काढून विचार करीत बसत नाहीं. जगायचें आणि जगवायचें, हेंच तर त्याचें तत्त्व!

**सुंदर** : मानानें ज्याला जगतां येतें त्याचें ठीक ग! पण माझें—माझें हें पाप!

**पद्मा** : कसलं पाप? प्रेम करून फसलीस हें पाप नाहीं, दुर्दैव म्हण पाहिजे तर. सुंदर, तूं पापी नाहींस—दुर्दैवी आहेस. आणि—आणि थोडीशी वेडीपण आहेस.

**सुंदर** : मला आतां कुणीहि—कांहिहि म्हणावें.

**पद्मा** : जगाला भिऊन—पळून, अज्ञातवास स्वीकारणें हा पहिला वेडेपणा. तुझ्या भावावर तुझा विश्वास नाहीं भाझ्यावर विश्वास नाहीं तुझा? आम्ही तुला सहानुभुति देणार नाहीं असें वाटलं तरी कसें तुला?

**सुंदर** : जाऊं दे! झालं गेलं गंगेला मिळालं—

**पद्मा** : असं कुठं झालंय्-सुंदर ! माझ्यापासून लपवून ठेवलेली सारी, सारी, हकिगत सांग आतां-गेल्या सहासात महिन्यांतली.

**सुंदर** : कशाला तेंच तेंच उगाळतेस ?

**पद्मा** : मला कळलें पाहिजे सारं. मघाशीं काय म्हणालीस-आत्महत्त्येपासून कुणी बचावलं तुला ?

**सुंदर** : ज्या बाईनीं माझी हॉस्पिटमध्यें सोय केली त्यांनींच. हॉस्टेलमधून एका रात्रीं मी बाहेर पडलें व आत्महत्येच्या विचारानें-समुद्राच्या रोखानें चाललें होतें.-तों त्या बाई मला भेटल्या. त्यांना शंका आली-त्यांनीं माझा हात धरला; पाठीवरून सहानुभुतिपूर्वक हात फिरवला—मला घरीं नेलें. आणि गेले सहासात महिने माझें, पोटच्या पोरीप्रमाणें सर्व कांहीं केलं. माझं नांव बदलून आणि ही माझी मावस बहीण आहे, विधवा आहे-नवरा मेला तेव्हां हिला दोन-तीन महिने गेले होते—वगैरे सांगून माझी हॉस्पिटलमध्यें व्यवस्था केली. नंतर तूं आपल्या डॉक्टर मैत्रिणीला भेटायला म्हणून आलीस—मला ओळखलंस—सांगितली ना या क्षणापर्यंत हकीगत ?

**पद्मा** : सांगितलीस, पण—मुख्य गोष्ट वगळून !

**सुंदर** : ती कोणती ?

**पद्मा** : ज्यानं स्वैरप्रेमाचे खेळ खेळून तुझी अशी परवड केली त्याचें नांव—बाळाच्या पित्याचें नांव ?

**सुंदर** : मला तें विचारूं नको ?

**पद्मा** : कां म्हणून ? सुंदर, तुझ्या या गोड बाळाला उजळ माथ्यानें जगांत जगतां यावें म्हणून तूं आतां पदर बांधून जगापुढें सामना द्यायला हवास. निदान या बाळासाठीं तरी—कां ग प्रेम करीत नाहींस त्याच्यावर ? (बाळाला घेऊन) कसा हंसतोयू लबाड-कसा गोड आहे माझा बगड्या ! वास्तविक या बाळाचें कित्ती कौतुक असायचं ! न्हाऊं माखूं, अंगडें टोपडें, बाळलेणें-बाळंत-विडे-केवढें ऐश्वर्य असायला पाहिजे होतं या बाळराजाचें ! मामा-मामीच्या कौतुकाला तर पूर आला असता. पण आज बिचाऱ्याला साधें अंगाई गीत सुद्धां पारखं आहे.—बाळ, बाळ, मींच म्हणतें हं तुला एक गाणें—आई म्हणत नाहीं तर मावशीला तरी नको का म्हणायला—

पद

**बाळा, तुझी मावशी गाते**
**तुज खेळविते, आणि सांगते, तुझें जगाशीं नातें ।**
**बाळा, तुझी मावशी गाते ॥धृ०॥**
**दिनवाणा तूं घटक जगाचा, हक्क तुला जगण्यातें**
**दुःख साहुनि भाग्यवंत हो आशिस तुज मी देतें**
**बाळा तुझी मावशी गाते ॥ १ ॥**
**चिमण्या जीवा कुणा न माहित—'तात' कोणता कोठें ?'**
**उपेक्षिलेलें जीवन तान्ह्या, तुझ्या नशिबीं येतें**
**अश्रू जननिचे न्हाउं घालती; मूक शब्द ऐकवितें**
**बाळा तुझी मावशी गाते ॥ २ ॥**

[ गाणें संपल्यावर दार वाजतें. पद्मा दार उघडतें. रवींद्र, पद्माकर येतात.

**रवींद्र** : सुंदर, किती दिवसांनीं दिसते आहेस तूं! माझ्यावर अविश्वास ठेवून अज्ञातपणानें वावरलीस इतके दिवस! सुंदर, आईच्या व बाबांच्या मागें एकुलत्या एक ताईचें जिवापलीकडे कोडकौतुक केलें, त्याचें प्रायश्चित्त अविश्वास हेंच का ?

**सुंदर** : दादा, नकोस रे बोलूं. मेलेल्या जीवाला आणखी मारण्यांत काय हंशील ? दादा, मी चुकलें दादा, मी फसलें रे !

**रवींद्र** : सुंदर, तुझ्या अज्ञातवासानें या रवींद्राला सगळं जग अज्ञात असें झालें आहे. सुंदर, काय झालं हें !

[ दोघेहि रडतात.

**पद्माकर** : रवींद्र, तुमच्या अश्रूंच्या पुरानें परिस्थिती थोडीच वाहून जाणार आहे ? भावनावश होऊन मूढ बनूं नका. ( पद्मास ) तुम्हांलासुद्धां अश्रूंच्या भावना होताहेत !

**पद्मा** : होय बरं ! अश्रू नसायला, माझं हृदय थोडंच पुरुषी डॉक्टरसारखं पाषाणहृदयी आहे !

**पद्माकर** : पण पुरुष डॉक्टरलासुद्धां कधीं कधीं प्रेमाचे पाझर फुटतात.

**पद्मा** : तें दिसतंच आहे ! त्यांतल्याच कुणाच्या तरी प्रेम पाझरांनीं सुंदरताई अशी वाहवली.

**पद्माकर** : सुंदरताई वाहवली तरी तिला आम्ही बाहेर काढूं; पण तुम्ही मात्र आपल्याबरोबर मलाहि ओघाला लावणार !

**रवींद्र** : अरे, पण यावेळीं भांडलांत नाहीं तर तुमचे भांडोरं प्रेम आम्हांला दिसायंच कां नाहीं ?

**पद्माकर** : तुम्ही रडायला लागलांत म्हणून आम्ही भांडायला लागलों.

**रवींद्र** : पण भांडायला लागलास कीं, तुझ्या हृदयांतला पद्माचा जीव पंढरीच्या पांढऱ्या पायावर बिलगूं लागेल !

**पद्मा** : दादा, असं कांहींतरी बोला पण रडूं आवरा.

**सुंदर** : खरंच, दादा, आपण विषयच बदलूं. तूं त्या वेड्या पंढरीबद्दल कां बोलत होतास ?

**प्रभाकर** : अग तो वेडा नाहीं यांच्या बंधुराजांनीं त्याला म्हणे यांचें वेड लावलं आहे !

**पद्मा** : तुम्हांला मात्र आतां वेड लागायची वेळ आली आहे !

**पद्माकर** : वेड लागायचं आतां शिल्लक कुठं ठेवलंत आहां ? तारेबरोबर धांवतच निघालों. म्हटलं सुंदरताईबरोबर तुमचं दर्शन घडलं तर जरा तरी वेड कमी होईल. पण हें कमी होणारं वेड नाहीं; वाढणारं आहे म्हटलं.

**रवींद्र** : तुझं बोलणं मात्र आतां फार वाढत चाललं.

**पद्माकर** : तुमचं रडणं नाहींसं झालं असलं तर मी आपलें बोलण्याचें वेड आवरतें घेतों. बरं, सुंदरताई, कसं करायचं पुढं ?

**सुंदर** : करणार काय ? जगानं टाकली—

**पद्माकर** : जगानं टाकली पण आम्हीं कधीं टाकली ? आम्हीं टाकण्यापर्यंत तुम्ही पाळीच येऊं दिलीत नाहीं ! ताई, आपलें दुःख आपल्या हाडामांसाच्या माणसांना सांगायचं नाहीं तर कुणाला सांगायचं ?

**रवींद्र** : सुंदर, आतां तरी सांग पाहूं सर्व. निदान पितृहीन दिसणाऱ्या या बालकाकरितां तरी तोंड उघड.

**सुंदर** : यानंच तर माझं तोंड गप्प केलं. याच्या जन्मानेंच माझा नायनाट झाला.

**पद्मा** : दुर्दैवाच्या तडाख्यांत प्रेमाचा नायनाट झाला, तरी प्रेमाचं कर्तव्य टाळतां येणार नाहीं.

ुंदर : पण त्याच प्रेमाचें पापांत रूपांतर झालें ना !

द्माकर : पण, खरं प्रेम असेल तर त्यांत पापाचा गंधहि असूं शकणार नाहीं. ग हें बालक तर काय ?–प्रेमाचं सजीव स्मारकच ! मातापित्याच्या तुटलेल्या मशृंखला जोडल्याशिवाय कधींच रहाणार नाहीं. हा दुवा घडविणाराच नांव ांग. मग हा पद्माकर तुमची तुटलेली सांखळी जोडून दिल्याशिवाय खास हणार नाहीं !

द्मा : ताई, खरंच सांग ना ! खऱ्या प्रेमानें विश्वासून फसली असलीस तर ितीहि पापी मनुष्य असला तरी तुझ्या पायाशीं लोटांगण घालीत येईल. ताई, ांग, तुझ्या बाळाची तुला शपथ आहे. या निष्पाप अर्भकाकरितां तरी तोंड घड. पहा, एकदां आपल्या बाळाकडे पहा. त्याचा निष्पाप चेहेरा तुला कांहींच ां सांगत नाहीं ? कोणाहि कुलवान् बालकाइतकाच त्यालाहि आपल्या पित्याचें ांव अभिमानानें सांगण्याचा हक्क आहे.

ुंदर : पण त्याच्या पित्याला त्याचा अभिमान कुठें आहे ? नुसत्या बाळाच्या र्शनाच्या भीतीनं, दर्शनाआधींच त्यांनीं पाठ फिरविली !

द्माकर : पाठ फिरविली असली, तर बाळानं त्याच्याकडे तोंड फिरवून ाहिल्याबरोबर त्याच्या जन्माची त्याला ओळख पटेल ! स्वतःच्या पित्याचें नांव ांगण्याचा आपल्याला जितका हक्क आहे, तितकाच आपल्या बाळालाहि ापलं नांव सांगण्याचा हक्क आहे याची त्याला जाणीव हवी. स्वतःच्या मातेची ाठवण देऊन, बाळाच्या मातेलाहि आपल्या मातेइतकाच सौभाग्याचा, ातृत्वाचा अधिकार आहे या गोष्टीची त्याला जाणीव करून देऊन, तुझं ौभाग्यधन हा पद्माकर तुला मिळवून दिल्याशिवाय रहाणार नाहीं.

वींद्र : सुंदर, बोल, एक शब्द बोल. एका शब्दाबरोबर तुझ्या सुखासाठीं हा ुझा भाऊ वाटेल तो त्याग करायला तयार आहे.

ुंदर : काय करूं ? कसं सांगूं ? बाळ–बाळ, तुला मीं कलंकित केलं ? बाळ, ुझ्यामुळें मी कलंकित झालें असेन तर मला कलंकरहित करण्याचं सामर्थ्यहि ुझ्यांतच असणार ! पद्मा, ऐक मन घट्ट कर. पण–नकोच.

द्मा : ताई, असें काय बरं ? शपथ आहे तुला.

ुंदर : तर मग तुझ्याच दादाला विचार. ( रडूं लागते )

**पद्मा** : ( एकदम आश्चर्यानें ) काय? माझ्या दादाला ! ताई—

**रवींद्र** : काय ? नागेशला ! त्याचा काय संबंध ?

**सुंदर** : आतां मला कांहीं विचारूं नका.

**पद्माकर** : नागेश ?

[ सुस्कारा टाकतो. विमनस्कपणें येरझारा घालतो.

**रवींद्र** : पद्माकर, आतां पुढें काय ?

**सुंदर** : देवा ! पुढं काय होणार माझं ?

**पद्माकर** : पुढचा मार्ग फारच कठीण दिसतो. सुंदरताईला मात्र पुण्याला न्यायचं.

**रवींद्र** : तरी पण पुढें काय ?

**पद्माकर** : ऐक. तिला कँपमध्यें, गुप्तपणें Nursing Home मध्यें तूर्त ठेवण्याची व्यवस्था मी करतों. आणखीन् कांहीं दिवस अज्ञातवास जरूर आहे. पुढचं मग ठरवूं.

**पद्मा** : मग काय ठरविणार ? अश्शी सुंदरताईला आणि बाळाला, दादासमोर उभी करतें. या दोन जिवांची एक जिवंत ज्योत काय करणार नाहीं ? अचेतन वाटणाऱ्या भूमींतून ज्वालामुखीचा स्फोट होतो–मग माझ्या दादाच्या सचेतन हृदयांत दडविलेलें पाप त्याच्याच मुखानें बाहेर आल्याशिवाय कसें राहील ?

**पद्माकर** : थांब, अशी घाई करूं नकोस, भांबावूं नकोस. अविचारानें सर्वस्वाचा नाश व्हायचा. पापाच्या परिसीमेंतच पश्चात्तापाचा उगम होत असतो. नागेशच्या पापाची शीग कांठोकांठ भरण्याआधीं ती लवंडायचा प्रयत्न केल्यास उसळीसरशी सुंदरताईबरोबरच तुलाहि पंढरीच्या—

[ दार वाजतें–पद्मा तें उघडतें. एक मुलगा चिठ्ठी घेऊन येतो.

**मुलगा** : आमच्येकडे आत्तांच एक ओळखीचे पाहुणे आले आहेत. त्यांनीं ही चिठी दिलीय् तुम्हांला.

**पद्मा** : ( चिठी वाचून ) पंढरीची चिठी—भेटायला आलाय् सुंदरला, नागेशच्या सांगण्यावरून. मी घरांत आहें किंवा नाहीं ही विचारणा केलीय् त्यांनीं !

**पद्माकर** : ( विचार करून ) हें पहा, त्यांना म्हणावें या पांचदहा मिनिटांतच आहोंत आम्ही घरीं.

[ ' बरं ' म्हणून मुलगा जातों.

**पद्मा** : हा वेडा कुठून आला बाई ?

**पद्माकर** : आला मसणांतून—आतां हें बघ, तूं प्रथम बाळाला आंतल्या खोलींत घेऊन जा. पण...पण हो, तूं जाच. सुंदरताई, तुम्ही थोडा वेळ मृत्यूला बोलवा—म्हणजे डोळे मिटून पडा. ( पद्मास ) हं, चला आटपा.

[ पद्मा मुलाला घेऊन जाते. सुंदर डोळे मिटून पडते.

**रवींद्र** : अरे, पण हें करतो आहेस काय तूं ?

**पद्माकर** : पंढरीचा सोहाळा ! तुम्ही जरा सुंदरताईजवळ बसून रडा हं.

[ रवींद्र सुंदरजवळ बसतो.

[ दार वाजतें, पद्माकर तें उघडतो. पंढरी येतो.

**पंढरी** : काय डॉक्टर? कसें आहे? सुंदरताई कशी आहे? तिची मैत्रिण पद्मा इथंच आहे ना ?

**पद्माकर** : ( दुःखानें ) हं इथंच आहे. ( सुस्कारा टाकतो ) हंऽऽ

**पंढरी** : म्हणजे–असं काय करतां हो ?

**पद्माकर** : काय सांगूं ! गेली हो, ती पहा. [ सुंदरकडे बोट दाखवतो.

**पंढरी** : म्हणजे पद्मा मेली ! अरे देवा ! ( खालीं बसतो ) आतां माझं लग्न ?

[ रडतो.

**पद्माकर** : अहो महाराज, उठा, घाबरूं नका. हं ती बघा पद्मा.

[ पद्मा येते.

**पंढरी** : अहाहा ! आहे रे आहे !

**पद्मा** : डॉक्टर, तुम्ही फारऽ उशीरा आलांत ! सुंदर गेली !

**पंढरी** : अरेरे ! आतां जावेंच. प्रेताजवळ थांबणें नको बुवा ! प्रेताला भिऊन तर कॉलेज सोडलं. बरं, मी जातों. ( पद्मास ) तुमच्या दादाला तार करतों.

[ घाईनें जातो.

**पद्माकर :** सुंदरताई, उघड आतां डोळे. डोळे उघडे ठेवून कांहीं दिवस आपल्या मृत्यूची मजा पहा.

**रवींद्र :** कमाल आहे पद्माकर तुझी !

**पद्मा :** नाटक चांगलं करतां येतं हो तुम्हांला.

**पद्माकर :** तुझ्यासारखी Heroine आहे म्हणून—

**रवींद्र :** बरं, पद्मा, पुण्याला जायची तयारी करा. आतां पुढच्या मार्गाला लागा. अगोदर नागेशाचं आणि सुंदरचं लग्न आणि नंतर—

**पद्मा :** एकदम कबूल.

**पद्माकर :** आम्ही दोघं बाहेर जाऊन येतों तोंवर करा तयारी.

**पडदा पडतो.**

---

# अंक २ रा



## प्रवेश १ ला



[ **स्थळ** : पुणें; नागेशचें घर, दिवाणखाना. सखाराम येतो.

**सखाराम** : आमच्या सायबाची काय भानगड हाय काय की ? साहेब गेल्याला दोन दीस झाल, पर पतुर बी नाय लिवलनी, वैनीबाईचा जीव तर खालीं वर होतुंया ! ह्या नागु वकीलाकडे म्हाईति काढाया पाठवलीन–पर तो हाय कुठं ? कवाबी बघा घरामदी मिलायचा नाय ! बाहेरचा नादच त्यास्नी भारी !

**लावणी**

**सखू वाचुन सुखच न्हाई**
**सखूसाठीं सखा धांव घेई ॥ धृ० ॥**
**तुज्या सुर्तिचा रोख**
**तुज्या कमरेचा झोक**
**तुज्या बिगर करमत न्हाई ॥ १ ॥**
**तुज्या जीवासाठीं**
**हुरहुर मोठी**
**भेट मला चल नारी देई ॥ २ ॥**

सखू तरी हाय का नाय ? सखू, अव सखू !

[ सखू येते.

**सखू** : कां ! सखूच्या नांवाशिवाय आरामच पडत नाहीं व्हय ?

**सखाराम** : अग, या सखारामाचा समदा आराम हाय सखूच्या खुशींत ! पर तुझी खुशी कधीं दिसल तवांना ? कवा बी आलों तरी आंखडून असायचीस !

**सखू** : मी आंखडलें तर तुम्ही लांब व्हा.

**सखाराम** : अग पर इतकी थंड कां ?

**सखू** : मग येताव कशाला थंड व्हायला. तुमच्या वाकिलाकडे ऊब न्हाई व्हय !

**सखाराम :** अग माझ्या वकिलाशीं जर मोप उब असती तर त्यांनीं सखारामाचा खिसा कदींच गरम केला असता. पर तो जसा थंडा तसा त्याचा धंदा बी थंडा. पर मानूस एकदम उमदा–न्हाई तर तुझा वकील! खिशाचा गरम असला तरी नरमपणा कुठं हाय? त्याच्याबरोबर जनूं तूं बी गरम!

**सखू :** पर तूं हाईस ना थंड!

**सखा :** अग, पर माझ्यासंगं तूं कुठं होतीस थंड?–माझ्याशीं म्होतूर लावल्या-बिगर तुझा जीव थंड व्हायचा नाय बग!

**सखू :** तुझ्याशीं म्होतूर लावून म्होरं काय पोरांचा बाजार भरायचाय व्हय! हतं कसं मोकळं हाय! तो गुजराथी बामन जेवण वाढतोय् अन् मालक पगार देतोय्! दिसाचा जरा कामधंदा केला नि मालकाच्या म्होरं असलं कीं रातभर आराम करून घटकाभर दिसास उठावं. अतां पद्माताई येतात, तवा जरा—

**सखाराम :** अग हो, पद्माताई कवा येत्यात त्येंच तर विचाराया आलों. आमचे साहेब बी न्हाय अजून आले.

**सखू :** अरे, कसे येतील? सुंदरताई वारल्या म्हनतात ना! त्येंची भईन वारली ना!

**सखाराम :** म्हणजे?

**सखू :** तो पंढरी डागदर मुंबईस गेला व्हता तो काल आला. तो धन्याशीं कायबा असं बोलत व्हता. इतके दिस व्हत्या, कुठ आनी एकदम मेल्या कशा?

[ पद्माकर व पद्मा मुंबईहून येतात.

**पद्मा :** कोण ग मेलं सखू? काय रे, सखाराम, कां रे आला होतास?

**सखाराम :** तुमच्याच तपासावर वहिनीबाईनीं धाडलनी हाय!

**पद्मा :** बरं, जा घरीं लवकर. तुझे मालक आले आहेत. आतांच जा.

[ सखाराम जातो.

**पद्मा :** सखू, गुजराथी आहे ना ग? जा, चहा करायला सांग. काय ग, दादा केव्हांसा येतो घरीं?

**सखू :** येत्याल अतां इकत्या मंदी.

**पद्मा :** होय का! बरं. जा तूं.

[ सखू जाते.

**पद्माकर** : बरं, मी जातों आतां घरीं !

**पद्मा** : चहा नाहीं वाटतं घ्यायचा ! कुणी वाट पहाणारं आहे वाटतं घरीं !

**पद्माकर** : वाट पहाणारं असतं तर वाटेंतूनच अशी दुसऱ्याच्या घरची वाट काढली नसती !

**पद्मा** : अस्सं ! हें दुसऱ्याचं घर झालं वाटतं !

**पद्माकर** : हें तुझं घर आहे असं म्हणायला आपण कांहीं तयार नाहीं !

**पद्मा** : मग ! आणखीन् कुठं आहे वाटतं माझं घर !

**पद्माकर** : मनांत असलं तर आणखीन् कुठं, तेव्हांच घर करतां येईल !

**पद्मा** : काय काय तुमच्या मनांत उगवतंय् कोण जाणें !

**पद्माकर** : कां ! एकदम माझ्या मनाकडे मोर्चा वळला !

**पद्मा** : प्रेमाच्या सत्तेखातर !

**पद्माकर** : मग प्रेमाच्या सत्तेनं माझं घर तें तुझेंच घर समज तर आजपासून—

**पद्मा** : तसं व्हावंसं वाटतं—मनापासून तसं वाटतं—पण—पण या घरांत आल्यापासून—

**पद्माकर** : वेडी आहेस ! खऱ्या प्रेमाला भीतीचं वावडं असतं. तुझ्या प्रेमाच्या बळावरच तुझ्या दादाजवळ सुंदरताईला विवाहबद्ध करण्याची मीं प्रतिज्ञा केली. तुझ्या प्रेमाचं कवच असं निखळूं लागलं तर तुझ्या दादाच्या पापाला वाचा फोडण्याची माझी हिम्मत कशी टिकणार ?

**पद्मा** : कां कोण जाणे, क्षणभर माझं मन शंकित झालं खरं ! सुंदरताईच्या आठवणीबरोबर, सुंदरताईच्या प्रेमाची अशी पायमल्ली झालेली आठवली म्हणजे माझ्या प्रेमावरसुद्धां दादाकडून प्रहार होण्याची भीति दुणावते.

**पद्माकर** : आज तुला झालंय् तरी काय ? नागेशाच्या हृदयांत दडविलेलें पाप बाहेर काढण्याची प्रतिज्ञा करणारी,—क्षणभर पद्माकरालाहि लाजवणारी पद्मा अशी कष्टी झाली तर तो पंढरी—

**पद्मा** : असं काय बरं बोलावं ? माणसाला काळजी वाटतच नाहीं वाटतं !

**पद्माकर** : मी काळजी करण्यासारखा माणूस आहे तर मग ?

**पद्मा** : जसं काय अत्तांच समजतें आहे !

**पद्माकर** : आतां मात्र गालावरचे गुलाब फुलले खरे !

पद

प्रीतिचा रंग गुलाबी राजसे
   नित गालीं विलसे ॥ ध्रु० ॥
उदयाचलीं, अन् संध्यासमयीं
इंद्रधनुच्या मोहक वलयीं
शोभते सप्तरंगी प्रीति मदालसे ॥ १ ॥
मृदुल, मधुर, सखी प्रणय भावना
दुजेपणाचा त्यास भाव ना
प्रणयरंगिं रंगती प्रणयी नित नवरसे ॥ २ ॥

**पद्मा :** खऱ्या प्रीतीचा प्रादुर्भाव प्रथम अंतरंगांतील गुलाब प्रफुल्लित करतो.

**पद्माकर :** अस्सं ! तर आतां निर्धास्त असूं ना ! जाऊं मी आतां ?

**पद्मा :** सकाळीं यायचं हो पण.

**पद्माकर :** आज्ञा राणीसरकार

[ जातो. पद्मा दारापर्यंत जाते व परत फिरते. सखू चहा आणते.

**पद्मा :** हें ग काय ? फार लवकर चहा आणलास ! बोलण्याच्या भरांत मी पण विसरलें. बरं, जा, नेऊन ठेव. मलासुद्धां आतां नको. आंग धुऊन मगच घेईन (सखू जाते) प्रेमाचं पंचामृत प्याल्यावर हें आंग्ल–अमृत कोणाला गोड लागणार ? पद्माकर, खरोखर तुम्ही या पद्माचे नाथ आहांत !

पद

प्रणय फुलवी मना
विहरती कल्पना
रम्य मधु भावना
सुखद संवेदना ॥ ध्रु० ॥
जीवनीं माधुरी
ओढ हृदयांतरीं
विरह तव क्षणभरी
साहवे मजसि ना— ॥ १ ॥

तुमच्या प्रेमाचं कवच माझ्याभोंवतीं असल्यावर मी दादाच्या वाग्बाणांना कां बरं भिऊं ? प्रेमाच्या पुण्याईनं तुमचं पवित्र अंतःकरण जर मला मिळवितां आलं

तर, त्याच पुण्याईचे बळावर दादाचं पापी अंतःकरण मला पुनीत करतां येणार नाहीं का ?

[ नागेश व पंढरी येतात.

**नागेश** : काय ग पद्मा, केव्हां आलीस ? बसा डॉक्टर.

**पद्मा** : झाला थोडा वेळ !

**नागेश** : रवींद्र आणि पद्माकर आले ना ! खरंच, सुंदरला झालं तरी काय ?

**पद्मा** : कोण जाणे ! फार आजारी झाली तेव्हां मला बोलावणं पाठविलं. सुटली बिचारी !

**नागेश** : रवींद्राला मात्र फार वाईट वाटेल. मी सुद्धां येणार होतों. पण इथं दोघांच्या केसेस् होत्या कोर्टांत. आणि हे डॉक्टर म्हणाले, मीच जातों.

**पंढरी** : तसं नाहीं कांहीं ! पण म्हटलं जावं. तुम्ही पण भेटाल !

**पद्मा** : मग भेटलेंच कीं ! पण तुम्ही दोन शब्दसुद्धां बोलायला थांबलांत नाहीं.

**पंढरी** : नाहीं, तसं नाहीं कांहीं. इकडे जरा काम होतं—

**पद्मा** : प्रॅक्टिस बरीच वाढली आहे वाटतं !

**नागेश** : अग, त्यांना काय प्रॅक्टिसचं ! घरीं काय कमी आहे ! हल्लीं बण्ड गार्डनवर नवीन बंगलासुद्धां खरेदी केला आहे त्यांनीं. काय डॉक्टर ? मेमसाहेबांना घेऊन तिकडेच रहाणार वाटतं !

**पद्मा** : जुळलं आहे वाटतं कुठें !

**नागेश** : तसं नक्की नाहीं अजून. बाकी पद्मा, सारखी तुझी आठवण करीत असतात. कॉलेजमध्यें बरीच फ्रेंडशिप् झालेली दिसते. आम्हांला न कळवितांच लव्ह्‌मॅरेजचा बेत नाहीं ना !

**पद्मा** : त्यांना काय ! पन्नास हजार रुपये हुंडा देणाऱ्या एम्. ए. मुली मिळतील.

**पंढरी** : तसं नाहीं कांहीं ! पण आल्या होत्या दोनतीन ग्रॅज्युएट्स् सांगून; पण म्हटलं, तुम्ही आल्यावरच ठरवूं काय तें !

**पद्मा** : मग ठरवा कीं ! मी येईन आमची भावी वहिनी पसंत करायला.

**पंढरी** : हो, हो, या कीं ! पण म्हटलं, तुम्हींच—

**पद्मा** : मीच येईन कीं. बरं, मी जरा आंत जाऊन चहाचं पाहतें हं.

[ पद्मा जाते.

**नागेश :** डॉक्टर, जरा कठीण दिसतंयू !

**पंढरी :** नाहीं, तसं नाहीं कांहीं ! पण आहे खरं जरा कठीण.

**नागेश :** कठीण असलं तर आपण करूं नरम. बरं, परवां म्हटलं त्या रकमेची काय तजवीज ?

**पंढरी :** उद्यां तयार आहे समजा. बरं, मी जातों आतां दवाखान्यांत.

**नागेश :** बरं या ( पंढरी जातो ) पद्मा भेटेपर्यंत भीतीनं जीव गुदमरला होता. पण आतां भीति दिसत नाहीं. सुंदर मेल्यामुळें अरुणेबद्दलची इच्छा मात्र वाढत चालली आहे. पापानें पाप वाढतें, हेंच खरें. सुंदरच्या मरणानं पश्चात्तापाऐवजीं पापी विचारांची वाढ झालेली दिसते. पाप आणि पुण्य—जाऊं दे, फार विचार करण्यांत अर्थ नाहीं ! ( वर्तमानपत्र काढतो ) पद्मा, ए पद्मा—

[ पद्मा येते.

**पद्मा :** काय दादा ?

**नागेश :** अग तुझ्या परीक्षेचं कांहींच सांगितलं नाहींस ?

**पद्मा :** माझी परीक्षा होय ! माझी परीक्षा राहूं दे ! पण—दादा, तुझी मात्र चांगली परीक्षा केली !

**नागेश :** म्हणजे काय ?

**पद्मा :** सुंदरताईच्या जीविताचा नाश कुणीं केला !

**नागेश :** म्हणजे मला काय माहित !

**पद्मा :** तुला माहित नाहीं–तर कुणाला माहित ? दादा, तुला हृदय तरी आहे का ? प्रेमाच्या खोट्या प्रदर्शनानें दोन जीवांचा चुराडा केलास—तरी खोटं बोलायचा मोह अजून आंवरत नाहीं !

**नागेश :** सुंदरनें सांगितलं तरी काय तुला ?

**पद्मा :** आपल्या नाशाचं कारण तुला विचारायला सांगितलं आहे, समजलास. आतां तरी तोंड उघड.

**नागेश :** मला विचारायला सांगितलं ! माझं नांव घेतलं !

**पद्मा :** हो ! तुझं नांव घेतलं; इतकंच नव्हे तर स्वतःबरोबर तुझं नांव सांगणाऱ्या तुझ्या बाळाचा बळीहि घेतला.

**नागेश :** म्हणतेस काय तूं—?

**पद्मा :** दादा, अजून तरी सत्य बोलून पश्चात्तापानें पावन हो !

**नागेश :** ताई, मी पावनच आहें. सुंदरनें मला विचारायला सांगून आपल्या पापाबरोबर मलाहि माझ्या शब्दांतून मुक्त केलें आहे !

**पद्मा :** म्हणजे काय ?

**नागेश :** म्हणजे हेंच कीं, याचा जाब पद्माकराला विचार !

**पद्मा :** दादा, तूं शुद्धीवर आहेस का ?

**नागेश :** मी पूर्ण शुद्धीवर आहें. तूं मात्र पद्माकराच्या प्रेमानें आंधळी झाली आहेस; म्हणून जवळ असून तुला सुंदरचा आणि पद्माकराचा संबंध दिसला नाहीं.

**पद्मा :** छे ! शक्य नाहीं. इतक्या पवित्र हृदयांत असलें पाप संभवतच नाहीं. माझं पवित्र प्रेम मला त्यांच्या पावित्र्याची साक्ष देत असतांना असल्या गोष्टींवर विश्वास कोण ठेवील.

**नागेश :** कां ? अजूनसुद्धां तुझी खात्री पटली नाहीं ?

**पद्मा :** हो, पटली ! पण ती तुझ्या हलकट मनोवृत्तीची. पण लक्षांत ठेव, पद्माकराच्या शुद्ध अंतःकरणाची ग्वाही माझं मन मला देत असतांना, तुझ्या नीच मनोवृत्तीचा मळ त्याच्यावर मुळींच बसणार नाहीं. स्त्रीचें हृदय म्हणजे विश्वासाचं माहेरघर असतं हें लक्षांत ठेव !

[ जाते.

**नागेश :** फांसा उलटा पडला, हरकत नाहीं. दान चोरण्याची कला मी आतां पुरेपुर शिकलों आहें.

**पडदा पडतो.**

---

## प्रवेश २ रा

[ **स्थळ :** रस्ता; वेळ सायंकाळीं ५ वाजतां.

[ पुणें कॅम्प नर्सिंग होमचा शिपाई येतो.

**शिपाई :** आतां या रवींद्र गायतोंडे वकीलाचें घर मिळणार कुठं ? पासोड्या मारुतीजवळ जायचं तो गवत्या मारुतीजवळ आलों. या पुण्यांतला एक बोळ चुकला तर चिमण्या गणपती राहून सोट्या म्हसोबा सांपडायचा. बरं. ठिकाणा

ळाला तरी, नेमका रवींद्र वकील कसा मिळणार ? बरं, वकील तरी एक हाय ! कुठल्याबी आळींत नी बोळांत जा. वकीलांच्या पाटयाच पाटया. बरं, पर यामधीं बेस् ; नाहींतर मुंबईमधीं ? पाटी मिळाली आणि हपिसांत शिरलं तर काच्या जागीं चार–चार वकील दिसत्यांत. डोक्यावर पाटया लावतील तर व पुसायचा त्रास तरी होणार नाहीं. बरं, ह्या बोळानं तरी जाऊन पहावं.

[ जातो.

[ नागेश कोर्ट ड्रेसमध्यें येतो.

**गेश** : सुंदरचं प्रकरण गळ्याशीं लागणारसं वाटतं. कोर्टात रवींद्र माझ्याशीं ळलाहि नाहीं. पद्माला सांगायला गेलों एक आणि झालं भलतंच. सखूची ष्टहि पद्माच्या लक्षांत आलेली दिसते. सुंदरच्या प्रसंगानें सावध होऊन ततिनियमनाचे उपाय अमलांत आणले तरी शेवटीं एका मोलकरीणीनें दगा लाच. सखूला घराबाहेर तर काढलीच.

[ जाऊं लागतो. तोंच शिपाई पुन्हा येतो.

**पाई** : साहेब, एवढा ठिकाणा सांगता काय ? कोणच्या बी बोळांत मिळत हीं. [ पत्र पुढें करतो. ]

**गेश** : पाहूं बरं. रवींद्र वकील पाहिजेत होय !

**पाई** : होय साहेब. एकदम जरुरीची चिठी आहे.

**गेश** : ( चिठी घेतो ) ऑ, कॅम्प नर्सिंग होममधून आलास ? काय आहे बरं ं. (चिठी वाचतो) Your baby is getting continuous convulons. Please come immediately. Supdt. हें काय प्रकरण आहे ? , हें पहा, तूं सरळ या रस्त्यानें जा आणि उजव्या हाताकडे वळ; दोन घरं कून तिसरंच घर. जा.

**पाई** : बरं, रामराम. साहेब

[ जातो.

**गेश** : हें काय प्रकरण आहे! रवींद्राचें मूल आणि तें कॅम्प नर्सिंग होमयें ! रवींद्राला हे मूल कोठून आलें ! कांहींतरी भानगड दिसते आहे ! हुण जग दिसतं तसं नसतं हेंच खरं ! रवींद्रासारखा साळसूद दिसणारा णूस—खरंच ही हकीगत समजली तर अरुणेला काय वाटेल ? अरुणा !

अरुणेच्या प्राप्तीला या गोष्टीचा उपयोग--बस्स ठरलं! अरुणेच्या प्राप्तीला हीच संधी योग्य!

[ पंढरी येतो.

**पंढरी** : काय वकीलसाहेब! रस्त्यांतच काय उभे!

**नागेश** : कोण डॉक्टर! नाहीं! सहज विचार करीत होतों कीं—

**पंढरी** : रस्त्यांत कसला विचार-? पद्मा, घरीं आहे का?

**नागेश** : हो, हो, असेल.

[ पुन्हा विचार करूं लागतो

**पंढरी** : हें काय हो? अजून कसला विचार करतां?

**नागेश** : डॉक्टर, खरं सांगू का? तुम्हांला जसा पद्माचा ध्यास लागला आहे तसा मलाहि—

**पंढरी** : हं, सांगा तरी-

**नागेश** : ( हळूच ) अरुणेचा ध्यास लागला आहे.

**पंढरी** : म्हणजे? अहो ती लग्नाची बायको—तुमच्या मित्राची—

**नागेश** : मग पद्मा तुमच्या मित्राची बहिण नाहीं वाटतं. डॉक्टर, अहो हे स्वैरप्रेमाचे दिवस आहेत. अहो तिचं--

**पंढरी** : खरंच! पण—पहा बुवा—

**नागेश** : पहा काय? पद्मा पाहिंजे असेल तर मला मदत केली पाहिजे. नाहींतर पद्माकर पद्माला घेऊन जाईल आणि तुम्ही बसाल हांका मारीत. अहो, त्या सुंदरला नाहीं का पद्माकरानें पळवली?

**पंढरी** : म्हणतां काय?

**नागेश** : अगदीं खरं. अहो, जग हें असं आहे. मग काय!

**पंढरी** : सांगाल तसं. पण पहा बुवा आपल्यावर कांहीं येतां उपयोगी नाहीं.

**नागेश** : त्याची नको काळजी. तुमच्या बंडगार्डनवरच्या बंगल्यावरच आम्ही जाऊं.

**पंढरी** : खुशाल. पण पद्माचं जमवा बुवा लवकर!

**नागेश** : तें मी करतों. पण यांतलं कुणाला कळतां उपयोगी नाहीं. नाहींतर पद्मा मिळायची नाहीं.

**पंढरी** : ते नको सांगायला. इतका कांहीं मी हा नाहीं !

**नागेश** : बरं, डॉक्टर, मी घरीं जाऊन चहा घेऊन जातों रवींद्राकडे. तुम्ही मग थोड्या वेळानें जा पद्माला भेटायला.

[ दोघे दोन बाजूंनीं जातात.

---

## प्रवेश ३ रा

[ **स्थळ** : रवींद्र वकीलाचें घर. वेळ : सायंकाळीं ५॥ वाजतां. सखाराम फर्निचर झाडीत असतो.

**सखाराम** : ( गुणगुणतो ) 'नाविका मी तूं नांव ! येऊं चल रंग रोजगारीचा करून !' सखू जर का म्होतूर लावाया कबूल होईल तर खराच रंग येईल. नाइतर कशाचा रोजगार ! रोज गार मातर पडतुंया. तो नागु वकील तिला सोडीतच नाहीं.

[ अरुणा येते.

**अरुणा** : अरे सखाराम, केव्हांचं तुला सांगितलं शिंप्याकडून तेवढे कपडे घेऊन ये म्हणून. अरे उद्यां तरी पाठवायला हवेत. नाहींतर बारसं होऊन गेल्यावर का बाळंतविडा पाठवायचा ? जा पाहूं आधीं.

**सखाराम** : उंद्या सकाळीं देतों म्हणून कबूल केलंन हाय, बाईसाहेब !

**अरुणा** : बरं, सकाळीं लवकर आण हं; उद्यांच्या टपालाला पाठवायलाच हवेत. ( सखाराम जातो ) सुंदरवन्सं वारल्यापासून चैनच पडत नाहीं. घरीं आल्या असत्या तर असं कशाला झालं असतं ? वन्सं, आमच्यावर कां बरं अविश्वास ठेवलात. कोणत्याहि परिस्थितींत या तुमच्या वहिनीनं तुमचं आणि तुमच्या बाळाचं संरक्षण केलं असतं.

[ शिपाई येतो.

**शिपाई** : रवींद्र गायतोंडे वकील इथंच राहात्यात काय ?

**अरुणा** : हो बरं ! काय आहे ? कोर्टांतून अजून यायचं झालं नाहीं.

**शिपाई** : बरं, मग आल्यावर ही चिठी द्या त्यासनी.

**अरुणा** : बरं, देईन हो. जा तूं.

[ शिपाई जातो.

**रुणा** : कुणाचं बरं पत्र ? नर्सिंग होममधून आलं आहे– ? पाहूं बरं काय ाहे तें ! ( चिठी वाचते ) काय वाचतें मी हें ! या चिठींतला मजकूर अगदीं ष्ट आहे. माझ्या पतीचें मूल ! – विचारसुद्धां सहन होत नाहीं. माझ्याशीं प्रतारणा - माझी फसगत झाली का– ? इतके दिवस हृदयांत कोंडलेलें असत्य अशा रीतीनें ाहेर येऊन, नाथ, तुमच्या नांवाला काळिमा फासणार का ? माझी अपत्याची पेक्षा अशा रीतीनें पुरी केलीत ! अपत्यजन्माचा आनंद मिळण्याची आशा फल होण्याचा योग येण्यापूर्वीच पतिप्रेमाला पारखें होण्याची पाळी आली ! तीनें पत्नीचा विश्वासघात केल्यावर प्रेमाचीं फुलें उमलण्यापूर्वीच अपुऱ्या ाढीनें कोमेजून कां नाहीं जाणार ?

**पद** : राग–मिश्रजोगी भैरव, ताल–धुमाळी

**होई कसा मम घात, असुख आतां या जगतीं ॥ धृ० ॥**
**सहज बने पतिप्रेमाची, गंधहीन अवघी माती**
**हा दैवा घात कसा या क्षणीं पडे**
**वैवाहित आयुष्या, रोग हा जडे**
**इथुन पुढें या जीवाला, कुठुन असावी सुगती ॥ १ ॥**

[ रवींद्र येतो.

**रवींद्र** : हं. घ्या हीं झबलीं नी टोपरीं ! द्या पाठवून ताबडतोब. कोर्टांतून येतांना वाटेंत दिसलीं तीं घेतलीं. म्हटलं, एकदां तरी राणीसाहेबांच्या भाच्याचें कौतुक होऊं द्या आमच्या हातून !

**अरुणा** : माझ्या भाच्याचें कौतुक करायला मी समर्थ आहें. आपण आधीं आपल्याच मुलाचं कौतुक करावं. ( झबलीं फेंकते )

**रवींद्र** : माझ्या मुलाचं—! कुठं आहे माझं मूल !

**अरुणा** : लष्करांतल्या नर्सिंग होममध्यें !

**रवींद्र** : म्हणजे काय ?

**अरुणा** : म्हणजे हेंच, कीं आपण मला फसवलीत. आपल्याला पोरं पोसण्याची ताकद कां नाहीं हें मला आज समजलं !

**रवींद्र** : तूं म्हणते आहेस तरी काय ? या बोलण्यानं मीं काय समजूं ?

**अरुणा** : ही चिठी पहा म्हणजे बरोबर समजेल !

**रवींद्र :** ( चिठी वाचून ) काय ? बाळ आजारी—!

**अरुणा :** होय बरं. आपलेंच बाळ आजारी आहे.

**रवींद्र :** तुझा हेतू तरी काय ? अरुणा, कसला घाणेरडा आरोप तूं माझ्यावर करीत आहेस !

[ चिठी खालीं पडते.

**अरुणा :** देवा, माझ्या प्रेमाची अशी विटंबना व्हावी ना—! ( रडते )

**रवींद्र :** ( विचार करून ) बरं, हें पहा—तुझा हा मूर्खपणा बस्स झाला. माझ्यावर तुझा विश्वास आहे ना !

**अरुणा :** म्हणूनच त्याचा असा घात केलात वाटतं !

**रवींद्र :** तुझ्याबरोबर वाद करून वेळ घालवण्यांत अर्थ नाहीं. तुझं मन इतकं लवचिक असेल ही मला कल्पना नव्हती. ठीक आहे, मी जातों. खुशाल तर्क कुतर्क करीत बैस. ( जातो )

**अरुणा :** प्रत्यक्ष खात्री पटल्यावर तर्ककुतर्क कसले—? पण माझ्या मनाची खात्री खरोखर झाली का ? माझ्या पतिदेवांच्या प्रेमाची शंका घेऊन मी निष्कारण त्यांना पापांत ढकलीत नाहीं ना ? छेः ! ती चिठ्ठी अगदीं स्पष्ट होती. शंकेला स्थान असेल तर उलगड्याचा एक शब्द बोलल्याशिवाय जाणंच झालं नसतं. देवा, माझ्या आयुष्यांतील आनंद अपत्यजन्मानं दुणावण्याऐवजीं पतीच्या पापमूलक अपत्यामुळें नाहींसा होणार का ? ( रडते—नागेश येतो )

**नागेश :** वहिनी, रवींद्र नाहीं आला वाटतं अजून ! पण—हें काय—? तुम्ही—रडतां—कां ? सगळीं खुशाल आहेत ना—?

**अरुणा :** हो. खुशाल आहोत. तसं कांहीं विषेश नाहीं !

**नागेश :** पण थोडं तरी आहे ना—! रवींद्र कुठं आहे ?

**अरुणा :** ते आत्तांच बाहेर गेले !

**नागेश :** म्हणजे ? कोर्टातून आला केव्हां आणि गेला केव्हां ? काय भानगड आहे तरी काय ?

**अरुणा :** तुम्हांला काय करायचं आहे, भाऊजी, आमच्या कर्मकटकटी ऐकून ?

**नागेश :** असं कां बरं म्हणता वहिनी—? तुमच्या पतीचा, म्हणजे तुमचाहि मी मित्र नाहीं का ? आपल्या माणसाला, आपलं दुःख सांगायचें नाहीं तर

कुणाला सांगणार ? सुंदरताईची तार आली तेव्हांसुद्धां नागेशपेक्षां पद्माकरच जवळचा वाटला–! दुर्दैव आमचं—!

**अरुणा :** मलासुद्धां, भाऊजी, तेव्हां कांहीं कळवलं नाहीं हो ! भाऊजी, असे कष्टी होऊं नका. ती पहा चिठी पडली आहे, ती वाचा; म्हणजे समजेल सगळं.

**नागेश :** ( चिठी वाचलीसं करून ) काय हें ! रवींद्राला मूल कुठलं ? तरी मला वाटलंच असं कांहींतरी होणार म्हणून !

**अरुणा :** म्हणजे काय, भाऊजी ? खरंच कां तसं कांहीं आहे !

**नागेश :** काय सांगू वहिनी–अरेरे, पत्नीचा विश्वासघात. त्यापेक्षां आमच्या-सारखे अविवाहित बरे. आम्ही उघड तरी स्त्रीपुरुषांच्या स्वैरप्रेमाची तरफदारी करतों. पण–हे एक पत्नीव्रताचे चहाते–( चिठी टेबलावर ठेवतो )

**अरुणा :** भाऊजी, नका असं बोलूं. कदाचित् खोटंहि असेल. देवा, काय माझ्या नशिबांत आहे—

**नागेश :** वहिनी, भिऊं नका. तुमच्या प्रेमाकरितां याचा जाब द्यायला रवींद्राला मी भाग पाडीन. जाऊं का असाच नर्सिंगहोममध्यें—

[ जाण्याचा आव आणतो.

**अरुणा :** खरंच, मी म्हणतें, आपण त्या नर्सिंगहोममध्येंच जाऊं! चलतां का भाऊजी ? दाखवितां का मला ती जागा ?

**नागेश :** पण–रवींद्राला काय वाटेल ! हरकत नाहीं. पत्नीशीं प्रतारणा करणारा मित्र असला तरी त्याची गय करून चालणार नाहीं. चला वहिनी, अशींच जाऊं टॅक्सी करून.

**अरुणा :** चला. सखाराम, ए सखाराम, मी जरा बाहेर जाऊन येतें हं;

[ जातात. सखाराम येतो.

**सखाराम :** ही काय भानगड हाय ? ( चिठी घेतो व पहातो ) यांत आपल्याला काय बी उमगत नाय. आमच्या सायबांना मूल कुठून आलां. सायेब लोक अशा भानगडी करायला लागले मग सखारामानें तरी कां उगाच बसावं. जातोंच सखूकडं आन् बघतों काय जमतांय का !

[ पद्माकर येतो.

**पद्माकर :** साहेब आहेत का रे सखाराम ?

**सखाराम :** सायेब नाय अन् वहिनीबाय पर नाय !

**पद्माकर :** म्हणजे ? आज काय फिरायला गेलेत वाटतं !

**सखाराम :** नाहीं बा. दुसरीकडंच कुठं गेलेत. काय बा मुलाची भानगड हाय. ही चिठी बघा.

**पद्माकर :** ( चिठी वाचून ) काय–बाळ आजारी ? केव्हांसे गेले रे ?

**सखाराम :** कोर्टांतून आले तसेच गेले. वहिनीबायचं आन् त्यांचं कायबा भांडण झालं. सायेब रागांत गेले बघा.

**पद्माकर :** मग वहिनी कुठं गेल्या तर ?

**सखाराम :** त्या नागु वकीलाबरोबर तकडच गेल्या हाइत, काय की भानगड हाय ती बघाया.

**पद्माकर :** नागेशबरोबर ? चिन्ह बरं दिसत नाहीं. अशा तऱ्हेनें गौप्य स्फोट झाला तर...तर...पद्माकडे जाऊन तिला घेऊन तिकडेच गेलं पाहिजे. नाहींतर कांहींतरी अनर्थ व्हायचा.

[ जातो.

**सखा :** जो येतो तो धावतोय्; आपुनबी सखूकडं धांव घ्यावी नी काय !

**पडदा पडतो**

# अंक ३ रा



## प्रवेश १ ला



[ **स्थळ** : नागेशचें घर. पद्मा येते.

**पद्मा** : (चौफेर पहात) शीः ! हा काय दिवाणखाना आहे कीं गांवचा उकीरडा ! घरांत घरची गृहिणी नाहीं – दादा गांवावर भटकत असायचा – नी सखू – बोलून चालून मोलकरीण–ती पण गेली घर सोडून. मलाच आंवरला पाहिजे हा पसारा. ( पुस्तकें, टेबलक्लॉथ वगैरे व्यवस्थित करते. घड्याळाकडे पाहून;) अगबाई ! इतके का वाजले – अजून पद्माकर कसे नाहीं आले ( दूरवर पाहून ) वास्तविक यायला हवेत ते इतक्यांत.

**मी तुझी पाहतें वाट**
**प्रीत गुणगुणें मनीं राजसा**
**जागृत मी भर रात ॥ मी तुझी पाहतें वाट ॥**
**जरी विरोधी प्रेम आपुलें**
**हृदय त्यामध्यें सदा रंगलें**
**तुझाच वांचुन दुजें न चिंतन**
**मन झालें तव भाट—मी तुझी पाहतें वाट**

अजून कांहीं यांना मुहूर्त सांपडत नाहीं यायला ! मग कबूल करावेंच कशाला अमूक वेळीं येईन म्हणून ! अतां येऊं देत वाटेल तेव्हां. आल्याबरोबर स्वागत करायला मी मुळीं इथं बसतच नाहीं – माझं अडलंय् ( जाते ).

[ पंढरी येतो.

**पंढरी** : हें काय ? इथं कोणीच दिसत नाहीं ! पद्मा कुठं गेली बुवा ? सखू पण दिसत नाहीं कुठं. जावंच तर मग. पण–पण पाहूंया सखूला हांक मारून– सखू, ए सखू.

**पद्मा** : (प्रवेश करून) कुणाला पाहिजे आहे सखू ? कोण, डॉक्टर–तुम्ही–तुम्हांला कशाला सखू हवी आहे ?

**पंढरी** : नाहीं, तसं नाहीं कांहीं ! म्हटलं, कोणच दिसेना; म्हणून आपली सखूला हांक मारली.

**पद्मा** : सखू गेली हें घर सोडून. जायचं आहे का तिच्यामागें ?

**पंढरी** : छेः छे ! तसं नव्हे, तिच्या मागं कशाला जाऊं ? तुमच्याकडेच आलों होतों.

**पद्मा** : होय का ? मग बसा ना.

**पंढरी** : सखू कां गेली बुवा तुमच्याकडून ?

**पद्मा** : आमच्या दादासाहेबांना विचारा. हें तुम्हा लोकांचे स्वैर प्रेम गरिबांना भोंवतें आहे.

**पंढरी** : तसं कसं होईल ? आजकाल मोठमोठे समाजसेवक परस्पर स्वैरप्रेमाची तर तरफदारी करतात !

**पद्मा** : समाजसेवक तरफदारी करतात, म्हणून तुम्हीं पण करता वाटतं ?

**पंढरी** : तसं नाहीं कांहीं. पण आपलं मलासुद्धां वाटतं—

**पद्मा** : काय वाटतं ?

**पंढरी** : कीं स्वैरप्रेम चांगलं. पण तुम्ही तर दाद देत नाहीं.

**पद्मा** : म्हणजे ! माझ्याशीं काय संबंध ?

**पंढरी** : तसं नाहीं कांहीं. पण–पण माझं आपलं तुमच्यावर प्रेम आहे.

**पद्मा** : खरंच का ? चांगलं आहे तर मग. ( विचारकरून ) माझं सुद्धां—

**पंढरी** : हं, बोला–बोला—

**पद्मा** : काय बोलूं ? माझंसुद्धां पद्माकरावर प्रेम आहे. पण—पण—

**पंढरी** : पण काय ? या तुमच्या 'पणा' मुळें मला जरा आशा वाटतेय हो–बोला—

**पद्मा** : ते फार गरीब आहेत हो !

**पंढरी** : मग मी श्रीमंत आहें !

**पद्मा** : तेंच तर ! पण, प्रेम एकीकडे आणि पैसा एकीकडे

**पंढरी** : मग त्याला काय हरकत आहे ? स्वैरप्रेमाचीं तत्त्वें कबूल करा.

**पद्मा** : पण स्वैरप्रेम म्हणजे तरी काय हो ?

**पंढरी** : ज्या प्रेमाला रूढी–नीतीचीं बंधनें नाहींत तें ! आपल्या खाण्यापिण्याला कुठं बंधन असतंय् ? आईनें वा बायकोनेंच केलेले पदार्थ प्रत्येकानें खाल्ले पाहिजेत असें कुठं आहे ? भूक लागली–कीं ज्याप्रमाणें आपण कुठल्याहि हॉटेलमध्यें–वा अन्य कुणा मित्राच्या घरीं केव्हांहि खातों पितों–तसेंच हें स्वैर-प्रेम ! नाहीं, आपलं मला जें वाटलें तें मीं सांगितलें हं ! या स्वैरप्रेमाच्या प्रांतांत तुमचा दादा अगदीं दर्दी आहे !

**पद्मा** :काय केलें माझ्या दादानें ?

**पंढरी** : तसं नाहीं कांहीं ! पण अलिकडे तुमचा दादा आणि अरुणा–(जीभ चावते)

**पद्मा** : काय म्हणालांत ?

**पंढरी** : नाहीं तसं नाहीं कांहीं.

**पद्मा** : हें काय बरं, मला नाहीं का सांगायचं ? हेंच का तुमचं प्रेम !

**पंढरी** : नाहीं, तसं नाहीं. पण—

**पद्मा** : पण काय ? नाहीं ना सांगत ! मग पद्माकरच पुष्कळ बरे. ज्यांचा मुळीं विश्वासच नाहीं—

**पंढरी** : नाहीं, तसं नाहीं कांहीं. पण तुमचे दादा रागावतील ना !

**पद्मा** : दादाजवळ का तुम्हांला लग्न करायचं आहे !

**पंढरी** : बरं बुवा सांगतों. तुमच्या दादाचं आणि अरुणेचंसुद्धां प्रेम आहे. तीं आमच्या बण्डगार्डनवरच्या बंगल्यावरसुद्धां जाणार आहेत. तुमचा दादाच म्हणत होता तसं.

[ पद्माकर येतो.

**पद्माकर** : काय म्हणत होता यांचा दादा ?

**पंढरी** : यांचं आमचं लग्न जमवायचं म्हणत होता.

**पद्माकर** : असं का ! छान ! पण पद्मा काय म्हणते ?

**पंढरी** : कबूल ! एकदम कबूल !

**पद्माकर** : खरंच कीं काय पद्मा ?

**पद्मा** : ( जड निश्वास टाकते )

**पद्माकर** : गप्प कां ?

**पद**

**बोले मंजुळ, गोड नित्य कोकिळा**
**या वेळीं कां धरिला असा अबोला ॥ धृ० ॥**
**श्रावणिचें का गमे फिकें चांदणें**
**कांचनाविना व्यर्थचि का सखे इतर कोंदणें**
**कुहु कुहु ही ललकारी कां ऐकूं येईना मला ॥ १ ॥**
**आम्रतरुचा कसा घडावा समसमा संयोग**
**हरसमयाला जमुनी यावा कसा साजणी योग**
**शरदाचीहि असुनी शोभा खुलवित कां न मनाला ॥ २ ॥**

**पद्मा** : काय उत्तर देऊं ? कबूल करून चुकलें खरी. तुमच्या प्रखर अशा खोट्या प्रेमापेक्षां यांचं साधं भोळं प्रेमच मला बरं वाटतं !

**पद्माकर** : म्हणतेस काय तूं ?

**पद्मा** : सुंदरताईची दुर्दशा कोणीं केली ?

**पद्माकर** : तुला ठाऊकच आहे.

**पंढरी** : हो, आम्हांलासुद्धां माहीतच आहे. तुम्हींच ते लबाड संभावित ! यांच्या दादानंच सांगितलं.

**पद्माकर** : याचा अर्थ काय ? पद्मा, तूं यावर विश्वास ठेवतेस ! स्त्रीहृदय म्हणजे नाना भावनांचं विचित्र कोडंच. प्रत्यक्ष स्त्रीहृदय घडविणाऱ्या ब्रह्म-देवाला जें आकलन करतां आलें नाहीं तें मला तरी कसं कळणार ? पद्मा, अजून तरी स्पष्ट बोल ! हें सर्व मी खरं समजूं का ?

पद्मा : तुझ्या स्तब्धतेचा मी काय अर्थ समजूं ?

**पंढरी** : अहो, त्यांनीं सांगितलं ना एकदां !

**पद्माकर** : ठीक आहे. तुझ्या इच्छेविरुद्ध तुला बोलायला लावण्याची माझी इच्छा नाहीं. जातों मी. [ जाऊं लागतो, पण आठवण होऊन ] हो, पण मी निराळ्याच कामाला आलों होतों. हें पत्र पहा, बाळ आजारी आहे. रवींद्र नर्सिंगहोममध्यें गेला आहे. अरुणेला संशय येऊन तीहि नागेशबरोबर तिकडे गेली आहे. कांहीं तरी घोटाळा होणार असं वाटलं म्हणून तुझ्याकडे आलों.

**पंढरी** : अहो, तो नागेश आणि अरुणा बण्डगार्डनवरच्या आमच्या बंगल्यांत गेलीं असतील.

**पद्माकर** : काय म्हणतो हा ? पद्मा, याचा अर्थ काय ?

**पद्मा** : याचा अर्थ—आतां आला माझ्या लक्षांत. थांबा हं जरा [ फोनवर जाते ] हॅलो हॅलो, कोण रवींद्र ? हो, मी पद्मा आहें. कसं आहें बाळाचं—हो, बरं आहे. ऑ- बरं तिकडे वहिनी आणि माझा दादा आलीं आहेत कां ? हॅलो- वहिनी आणि दादा नाहीं ? बरं, जरा थांबा.—पद्माकर कसं करायचं ? दादा वहिनीचाहि बळी घेणारसं वाटतं !

**पद्माकर** : समजलों सगळं. पण तुझा दादा आणि असं कृत्य ?

**पद्मा** : तें राहूं दे गडे यावेळीं. ती सगळी थट्टा हो.

**पंढरी** : थट्टा—? म्हणजे—? असं कसं होईल ! अहो, तुमचं आमचं लग्न ठरलं असें आत्तांच तुम्हीं म्हणालांत ना !

**पद्मा** : तुम्हांला खरंच वाटलं वाटतं !

**पंढरी** :-असं काय हो करतां ?—अंऽ—तुम्ही—

**पद्मा** : पुरे बाई तुमचा लघळपणा ! ( पद्माकरास ) खरंच गडे,पुढं काय करायचं !

**पद्माकर** : पुढें काय करायचं ! ( विचार करून ) yes, right, असंच ( फोन वर जातो ) हॅलो-हो कोण-रवींद्र ? मी पद्माकर आहें. हो-नागेशनं वहिनींना तिकडे म्हणून नेली—हॉं-आणि पंढरीच्या बंगल्यावर गेलीं आहेत. हां—लबाडी दिसते-तुम्ही सुंदरला आणि बाळाला घेऊन तिकडे या. हीच वेळ आहे. आम्ही निघालोंच.

[ फोन ठेवतो.

**पंढरी** : काय हो हें गौडबंगाल-सुंदर कोण ?

**पद्माकर** : मग तुम्हांला सांगतों काय तें. पद्मा, चल लवकर. टॅक्सींतूनच गेलं पाहिजे.

[ जातात.

**पंढरी** : अहो-अहो-पण-आं—? असं काय ? मला बनवतां होय ! नागेशला आधीं कळवलं पाहिजे—पण-ऑ-आपली मोटार आहेच; यांना कुठली टॅक्सी मिळते या पुण्यांत—चार आणे सवारीच्या टांग्याशिवाय या पुण्यांत

आणि टॅक्सी ? हं—या म्हणावं सवारीच्या टांग्यांतून तुडतुड करीत; तोंवर आमची स्वारी चालली पुढें फोंफावत.

[ जातो.

**पडदा पडतो**

---

## प्रवेश २ रा

[ **स्थळ** : रस्ता; सखू हातांत गांठोडें घेऊन येते.

**सखू** : पांढरपेशाच्या नादीं लागलं कीं ही पंढरीची वारी कराया झालीच. आतां वारकऱ्यासारी भीक मागत जाया झालं. मोठ्या घरच्या आरामापायीं सखारामाला बी दूर केला. जातीला सोडून जीवाची दैना मातर केली. पद्माताईंचे पाय धरले असते तर अशी वेळ आली नसती. पर त्यासनी सांगायचं कसं? त्या मेल्या नागु वकीलानें मातर मला पुरी नागवलान. देवा! आतां या पोटांतल्या गोळ्यासकट कुठें जाऊं ?

[ डोक्यावर हात देऊन खालीं बसते. सखाराम येतो.

**सखाराम** : सखूकडे धांव घेत नीघालां पर ती तरी दाद देते का नाय ? आपून मातर मोठ्यांच्या नादावर राहून मला उगीच नादीं लावलान् हाय—अरे पंर हां कोन ?—कोन ग ती—? सखू !

**सखू** : कोण, सखाराम—?

**सखाराम** : हां, काय ? गांठुडा घेऊनशान कुठं जातीस ? ( रडते ) आं ? रडाया काय झालं ?

**सखू** : मला अतां काय बी इचारूं नको.

**सखाराम** : म्हनजी काय ?

**सखू** : लकडी पुलावर जीव देया जात्यें.

**सखाराम** : अग पर कां ? जिवावर कां उठलीस अशी ?

**सखू** : एका जिवाचे दोन जीव झाले म्हणून !

**सखाराम** : म्हनजी काय ? सखू, तूं—

**सखू** : मालकानं सोडलन रे मला.

**सखाराम** : मग मी हाय ना? मी तर म्होतूर लावाया कासावीस झालों हाय ना. पर तूंच दाद देत न्हाईस!

**सखू** : आतां कशाचा रे म्होतूर? माझ्यासारी बायको तुला कशी चालेल—?

**सखाराम** : तुझ्यासारी म्हजे? तूं तर लय ब्येस हायस,!

**सखू** : आतां तुला कसं सांगूं? सखाराम मी–पोटशी...

**सखाराम** : पोटशी हायस व्हय? मंग (विचार करून) हरकत नाय. मी तरी म्होतूरच लावणार ना! दुसरा बी न्हवरा मेला समज. पर पोर–पोर बी मी बाळगीन. तुझ्या गुन्ह्याचे त्याच्याकडे काय? पर म्होतूर लावल्यावर जर का गडबड केलीस—

**सखू** : नायरे आतां तुला टाकायची.

**सखाराम** : चल तर, पहिलं आमच्या–मालकाकडे जाऊं. मग येगली खोली घेऊनशान बिऱ्हाड लावूं. गोताला जरा चहापाणी दिलां कि काय बी तरास नाई व्हनार. अतां हांस बगूं. हे बग सखू. तां तुजा रडगाना टाकूनशान येक अक्षी लय ब्येस गानं गा बरी–परवा ती लावणी बोलत व्हतीस नाय का भांडीं उजलतां, उजलतां. म्हण बरं ती.

**सखू** : ह्ये येड कुठन आला तुझ्या डोक्शामधीं!

**सखाराम** : मी दुसरां तीसरां काय नाय मागत. जरा वायच लावणी म्हणाया सांगतांय इतकांच. तूं लावणी म्हटल्याबिगर मी नाय पाऊल टाकायचा म्होरं.

**सखू** : काय खूळ लागलां का काय–बरं म्हनतां तर—

**सखू** : [लावणी]

**सजणा म्होतूर लावुनशान संवसाराचा लुटूं रंग ॥**
**लावूं बिऱ्हाड बेस ऽऽ**
**पान खाऊन हांस**
**होईन तुझ्या प्रीतींमधीं दंग ॥ १ ॥**
**तुला माझ्यावांचून**
**मला तुझ्यावांचून**
**या म्होरं नगं दुजा संग ॥ २ ॥**

[जातात.

# प्रवेश ३ रा

[ **स्थळ** : पंढरीचा बण्डगार्डनवरील बंगला. एका हॉलमध्यें अरुणा, नागेश. अरुणा कोपऱ्यांत एका खुर्चीस धरून उभी असून नागेश तिच्यापासून दूर उभा आहे.

**नागेश** : अरुणा, नीति–पातिव्रत्य वगैरे कल्पना स्त्रियांवर जुन्या पुरुष वर्गानें केवळ स्वार्थ बुद्धीनें लादलेल्या आहेत ! पुरुषानें खुशाल बाहेर मजा लुटावी, आणि पत्नीनें–त्याची वाट पहात उसासे टाकीत जीवन कंठावं, हा काय न्याय झाला ?

**अरुणा** : पण–मला अगोदर नर्सिंग होममध्यें घेऊन चला ! मग सावकाश ऐकेन हें तुमचें व्याख्यान—

**नागेश** : नर्सिंग होममध्यें कशाला ? सवतीचें दर्शन घ्यायला ? कीं तिच्या बाळाचें बारसें करायला ! किती भोळी आहेस अरुणा तूं ! नवऱ्याच्या ह्या विश्वासघाताचा सूड उगवायचा असेल तर माझ्या प्रेमाचा स्वीकार कर !

**अरुणा** : भाऊजी, कां विनाकारण मला छळतां ?

**नागेश** : छळतां ! मी तर तुझ्या प्रेमाची सवलत मागतां आहे. अरुणा, स्वैर–प्रेमाची मजा तर पहा. रवींद्राचें प्रेम तर दिसतेंच आहे; मग त्याच्या पत्नीनें—

**अरुणा** : खबरदार, भलतंसलतं बोलाल तर. पतीनं पत्नीला सोडलं तरी पत्नीला पातिव्रत्य सोडतां येत नाहीं. तुम्हांला स्त्रीहृदयाची काय परीक्षा होणार !

**नागेश** : अरुणा, तुम्हां स्त्रियांच्या हृदयांतल्या भावनांशीं कांहीं कर्तव्य नाहीं मला ! मी स्त्रीसौंदर्याचा भोक्ता आहें ! भ्रमर जसा कमलिनींच्या पाकळ्यांत कोंडून राहील, पण–मध प्याल्याशिवाय सोडणार नाहीं–तसंच अरुणा, हा नागेश–जिच्यावर त्याची नजर एकदां खिळली—

**अरुणा** : ( भेदरून ) भाऊजी, काय बोलतां हें ! खरंच, मी भोळी ! आतांपर्यंत तुमच्या राक्षसीपणाची कल्पना आली नाहीं मला !

**नागेश** : नवऱ्याच्या बाहेरख्यालीपणाची तरी कुठं तुला कल्पना आली होती ! वेडे अरुणे ! नवऱ्याचें प्रेम संपतांच–तुझ्या सौंदर्याचें योग्य कौतुक करायला दुसरा प्रियकर तुझ्यापुढें उभा आहे हेंच भाग्य समज. नीट विचार कर; नाहींतर—

**अरुणा** : नाहींतर काय ! माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत, स्त्रीजातीच्या अब्रूकरतां—

**नागेश** : स्त्रीजातीची अब्रू ! ती तर सुंदरनें चवाठ्यावर कधींच मांडली आहे. अरुणा तरी ती कशी सांवरणार ! म्हणे स्त्रीजातीची अब्रू !

[ धरायला जातो. पढंरी येतो.

**पंढरी** : अहो नागेश, अब्रू जायची वेळ आली—

**नागेश** : हा गद्धया ! इथं कशाला आलास ?

**पंढरी** : [ हळूच ] अहो ते येताहेत—

**नागेश** : अरे ते कोण ?

**पंढरी** : अहो ते—ते—

**नागेश** : अरे पण नीट बोल ना—

**पंढरी** : अहो पद्माकर, पद्मा—सगळे—सगळे

**नागेश** : घात झाला—ए मूर्खा, जा बाहेर—बंगला तुझा आहे. बाहेरच्या बाहेर माळ्याकडून घालवून दे—जा. [ जातो ] हं काय वहिनीसाहेब ! काय विचार—?

**अरुणा** : भाऊजी, या अरुणेला तुम्हीं काय समजतां ! बेशरमपणानें जीभ लांबवायला हा काय कुंटणखाना आहे ?

**नागेश** : ( विकट हास्य करून ) कुंटणखाना नसला तरी आपल्या उभयतांच्या प्रीतीचा दौलतखाना करण्याची इच्छा आहे माझी ! स्वैरप्रेमांतील नाना चवींचें सुख कळलेंच नाहीं तुम्हां लोकांना ! बघ तरी माझ्या हाताचा स्पर्श—तुझ्या त्या दुबळ्या रवींद्रापेक्षां किती मादक आहे तो......

[ हात धरायला जातो—ती ओरडते—दार वाजतें. ती पळत जाऊन दार उघडते. रवींद्र, सुंदर, बरोबर मूल अशीं प्रवेश करतात.

**रवींद्र** : नागेश, मित्रप्रेमाचा घात करून तूं स्वतःचा मात्र घात करून घेतलास. जिच्या सर्वस्वाचा नाश केलास तीच तुझा सत्यानाश करायला येथें सदेह उभी आहे. पहा नागेश.

**नागेश** : कोण सुंदर ! आणि जिवंत !

**रवींद्र** : होय, जिच्या मृत्यूनें आपली अब्रू जगली असं तुला वाटत होतं तीच

सुंदर, तुझ्या बेअब्रूचें गाठोडें अपत्यरूपानें जगाच्या वेशीवर टांगण्याकरतां जीवंत हजर आहे.

**नागेश** : माझा काय संबंध त्यांत ?

**सुंदर** : अजूनसुद्धां आपल्याला माझी दया येत नाहीं का ! आपल्या पहिल्या प्रेमाची प्रतिमा—आपला बाळ—याच्याकडे पाहून तरी—

**नागेश** : कुणाचं बाळ ! सुंदर, तुला वेड तर लागलं नाहीं ?

**रवींद्र** : तिलाच काय पण या तुझ्या कृत्यानें आम्हां सर्वांनांच तूं वेड लावलं आहेस. नागेश, तुला हृदय तरी आहे का ?

**नागेश** : रवींद्र, तुला खरोखरच वेड लागलं आहे. या पापाचा धनी मी नसून पद्माकर आहे !

**सुंदर** : काय हें बोलणें !

**नागेश** : हें बोलणें सत्य आहे. ही सगळी त्या पद्माकराची करामत.

[ पद्माकर, पंढरी, पद्मा येतात.

**पद्माकर** : पद्माकराची करामत तुला आतांच दिसेल. पद्मा, हा तुझा दादा हेंच विष तुझ्याजवळ ओकला होता ना !

**नागेश** : मग खरी तीच गोष्ट बोललों.

**पद्माकर** : नागेश, खरोखरच तूं नांवाप्रमाणें नागाच्या जातीचा आहेस. पाजी माणसा, अजून तरी खरं बोल. प्रत्यक्ष वहिनींना फसवून त्यांच्या पातिव्रत्यावर उठणारा तूं—

**नागेश** : कोण ? मी ! हा स्वैरप्रेमाचा काळ आहे. त्या आपण होऊनच—

**अरुणा** : हलकटा ! कां खोटं बोलून आणखी जीभ विटाळतोस. नर्सिंग होममध्यें नेतों म्हणून सांगून इथं फसवून आणलीस—

**रवींद्र** : पण तुला कांहीं मी परत येईपर्यंत धीर निघाला नाहीं—

**अरुणा** : चुकलं माझं, क्षमा करावी.

**पद्मा** : दादा, अजून तरी खरं सांग. तुझ्यामुळें आज मलासुद्धां मान खालीं घालावी लागत आहे.

**नागेश** : माझ्यामुळें ! मुळींच नाहीं. तुला डोळे असते तर ज्याच्यावर तूं प्रेम करतेस त्या पद्माकराचें कारस्थान—

**पद्माकर** : चूप–बदमाष ! तुझ्यासारखा नीच कोणतें कारस्थान करणार नाहीं ! प्रत्यक्ष जिच्या जीविताची ज्योत पेटविलीस ती सुंदरताई तुझ्यासमोर–तुझ्या अपत्यासह उभी असतां—

**नागेश** : कुणाचं अपत्य ! संबंध काय तिचा माझा ?

**पद्माकर** : संबंध काय ? ( सुंदर जवळून मूल घेऊन दाखवून ) हा पहा जिवंत संबंध ! दिसतो आहे तुला ? हें बालक तुला कांहींच सांगत नाहीं ?

**नागेश** : ( सुस्कारा टाकतो–बोलत नाहीं. )

**पद्माकर** : ठीक आहे ! तुझं हृदयच दगडाचं आहे–त्याला या बालकाच्या रक्तानेंच पाझर फुटतील !

**नागेश** : म्हणजे काय !

**रवींद्र** : पद्माकर, म्हणतोस काय तूं ?

**पद्माकर** : दुसरं काय म्हणणार ! हें बालकच या सर्व अनर्थाला कारण आहे. त्याच्या जन्मानेंच सुंदरताईच्या जन्माचें वाटोळं केलं; याच्यामुळेंच आज वहिनींवर प्रसंग आला, याच्यामुळेंच पद्माकर, पद्माला पापी दिसूं लागला–या सर्व अनर्थांचें मूळ–हें बालकच जगांतून नाहींसें केलं म्हणजे—

**पद्मा** : कां म्हणून ? हा बाळ आमच्या कुलाचा–वंशाचा अंकुर आहे–माझ्या दादाचा मुलगा आहे–माझा भाचा आहे. दादानें त्याचें पितृत्व नाकारलें तरी— साऱ्या जगाला मीं ओरडून सांगेन कीं हा माझ्या दादाचा नी सुंदरचा मुलगा आहे. मला त्या दोघांचे प्रेमव्यवहार माहीत होते. सुंदर, मला वहिनी म्हणून एकदम पसंत होती. पण दादा इतका उलट्या काळजाचा असेल ही कल्पना नव्हती मला. द्या इकडे बाळाला.

**पद्माकर** : दूर हो, सर्व अनर्थांचें मूळच या जगांतून मीं नाहींसें करणार ! पपितत्नींच्या प्रेमशृंखला अभंग ठेवणारा हा दुवा, त्या शृंखला तोडण्याला जर कारण होत असेल—

**सुंदर** : पद्माकर, नका हो माझ्या बाळाला—

**नागेश** : पद्माकर, तूं काय करणार आहेस !

**पद्माकर** : या मुलाला मारून टाकणार आहें. प्रत्यक्ष त्याचा पिता त्याच्यापुढें उभा असतांना, त्याच्या मनांत जर पितृवात्सल्य उत्पन्न होत नाहीं–जर त्याच्या

हृदयाला वात्सल्याचा पाझर फुटत नाहीं–तर त्याच्या रक्तानेंच त्याच्या पित्याला त्याची ओळख पटेल.

**रवींद्र** : पद्माकर–( जरा पुढें होतो )

**पद्माकर** : खबरदार–( पिस्तुल काढतो ) यावेळीं जर कोणी पुढें येईल, तर त्याचा या रिव्हॉल्व्हरनें प्राण घेईन ! माझ्यावरील आरोपांनीं कलंकित झालेलं हें माझं काळं तोंड, या बाळाबरोबरच मीं नाहींसं करणार ! नागेश, पहा तुझें हें अर्भक ! पिता असूनहि पोरकं म्हणून जगांत वावरण्याचें यापुढें साफ नाकारित आहे. तुझ्या इतकाच त्यालाहि, आपल्या पित्याचें नांव अभिमानानें सांगण्याचा हक्क असून, तो हक्क तूं नाकारल्याबरोबर नांवासकट जगांतून हें बालक निघून जात आहे. आपल्या जन्मानें, आपल्या मातेला पती जिवंत असून वैधव्यदशा येणार, म्हणून आपल्या मातेकडे कायमची पाठ फिरवीत आहे. बाळ, चल, तयार हो. तुझ्या निष्पाप रक्तानेंच या सर्वांना पावन करून घे.

[ मुलाला मारण्याचा आव आणतो.

**नागेश** : [ एकदम पुढें होऊन पद्माकरचा हात धरतो. ] पद्माकर, थांब, थांब. माझ्या बाळाला मारूं नको !

**पद्माकर** : कुणाचं बाळ ?—तुझं—?

**नागेश** : होय, माझं ! पद्माकर मी पापी आहें, पण माझ्या बाळानें आज मला पावन करून घेतलं आहे. पद्माकर, माझ्या पापाचें प्रायश्चित्त माझ्या निरपराध बाळाला देऊं नको.

**पद्माकर** : ( गहींवरून, ) बाळ ! तुझ्या पित्याला तुझी ओळख पटली—(त्याचा मुका घेतो ) जा, तुझ्या पित्याला आपल्यां मातेची ओळख करून देऊन तिचें सौभाग्य तिच्या हवालीं कर.

[ मूल नागेशला देऊं लागतो. इतक्यांत सुंदर मुलाला घेते.

**सुंदर** : पद्माकर ! द्या माझ्या बाळाला.

[ पद्माकरजवळून मुलाला घेते.

**पद्माकर** : म्हणजे !

**नागेश** : सुंदर, मी तुझा अनंत अपराधी आहें. मला क्षमा करशील का ?

**सुंदर** : क्षमा ? खरंच, क्षमा करायची—पण ती कुणी आणि कुणाला ? विकारांच्या भरांत, जननिंदेच्या भावी अनर्थाला भिऊन, कुंवारपणीं घडलेल्या चुकीनें पतीत ठरल्यावर, क्षमा करण्याचा अधिकार मला तरी कोण देणार ? लोकरूढीला अनुसरून लग्नाच्या—लग्नाच्या कसल्या, शरीरसंबंधाच्या पत्रिका वांटल्या गेल्या नाहींत, एवढ्याकरितां माझ्या खऱ्याखुऱ्या मनानें वरलेल्या पतीशीं झालेला संबंध व्यभिचार ठरला, तर या व्यभिचारी सुंदरला आपल्याला क्षमा करण्याचा कोण अधिकार देणार ?

**नागेश** : सुंदर, मला खरोखरच पश्चात्ताप झाला आहे—

**सुंदर** : पश्चात्ताप ? नाटकांतील प्रत्येक व्हिलनला शेवटीं पश्चात्तापच होत असतो ! पण त्या नाटकी पश्चात्तापाच्या अभावींसुद्धां आपण आपल्या पुरुषी सत्तेनें पापमुक्तच आहांत ! या सुंदरकडे वळणारी लोकदृष्टि मात्र कांहीं झालें तरी कलुषितच रहाणार ! मग अशा स्थितींत जननिंदेच्या वृथा आरोळ्यांना तोंड देऊन, माझ्या बाळाच्या साहाय्यानें पुरुषी निंदेचा हल्ला परतवीत, जन्मभर कुंवारच राहिलें तर—

**पद्माकर** : सुंदरताई—सुंदरताई !

**सुंदर** : कोण, पद्माकर ? खरंच, मीं तुम्हांला विसरलें होतें. आवेगाच्या भरांत तुम्हां उभयतांच्या श्रमांची आठवण मी विसरलें ! पद्माकर, पद्माताई ! आपल्या श्रमांचं मी सार्थक करीन; पण—

**पद्मा** : आतां पण बिण नकोग करूं सुंदरताई ! तुझ्या दादा-वहिनीकडे तरी पहा—तुझ्या बाळाकडे—

**सुंदर** : माझा बाळ ! ताई, करीन—यांचा मी स्वीकार करीन; पण आज नाहीं. यांच्या पश्चात्तापाचें हें नाटकी अवसान निघून गेल्यावर—ते खऱ्याखुऱ्या प्रेमानें माझा स्वीकार करायला तयार आहेत असं मला दिसतांच, मी लौकिक लग्न-पत्रिका वांटायला तयार आहें !

**नागेश** : हरकत नाहीं ! सुंदर-( अरुणेचे पाय धरतो ) वहिनी, आई ! मला माफ कर आणि माझा पश्चात्ताप मला खरीखुरी माणुसकी देईल असा आशिर्वाद दे !

**अरुणा** : सुंदर, आण त्या बाळाला. ( मुलाला घेऊन ) उठा भाऊजी, ( मुलाला नागेशजवळ देते ) आतां दोघांनीं सुखानें संसार करा बरं !

**नागेश** : पद्माकर, तुझी क्षमा मी कोणत्या तोंडानें मागूं !

**पद्माकर** : नागेश, पश्चात्तापाच्या पुण्याईनें तुझ्या सर्व अपराधांचें परिमार्जन झालें आहे ! बाळ, मृत्यूलासुद्धां फसवून मातापित्यांच्या प्रेमाचें जिवंत स्मारक तुझ्याशिवाय या जगांत दुसऱ्या कोणत्या रूपानें वावरणार !

**रवींद्र** : पण पद्माकर, या सगळ्याचें श्रेय तूं एकट्यानेंच घेऊं नको.

**पद्माकर** : ( पद्माकडे पहात ) पण दुकटं होण्याची आशा मावळल्यावर तें श्रेय मला तरी काय करायचं आहे ?

**सुंदर** : पद्माताई, असं ग काय म्हणतात हे ?

**अरुणा** : खरंच, पद्मा बोल ना ग !

**पद्माकर** : बोलण्यासारखंच कांहीं नाहीं, तिथं बोलणार काय ?

**पद्मा** : खरोखरच बोलायला कांहींच नाहीं, थट्टासुद्धां समजत नाहीं तिथं काय बोलायचं !

**पद्माकर** : असली थट्टा करायला मी पंढरी आहें वाटतं ! अरे खरंच, पंढरी ! तुझं कसं काय होणार ?

**पंढरी** : तसं नाहीं कांहीं ! आतां पंढरीची वारीच करतों झालं !

**पद्माकर** : तसं नका करूं. या पंढरीला इथंच एखादी वारकरीण पाहून देऊं म्हणजे झालं !

**सुंदर** : हा आनंदाचा क्षण ज्या माउलीचे सहानुभूतीनें आज लाभला–तिचा अगोदर आशिर्वाद घ्यायला जाऊं आपण.

**रवींद्र, पद्माकर, नागेश** : कोण माउली ?

**सुंदर** : जिनें मला आत्महत्त्येपासून परावृत्त करून बाळाच्या जन्मापर्यंत संगोपिलें ती !

**पद्मा** : मला सर्व ठाऊक आहे–सांगेन सारं मग ! लग्नाच्या कुंकुमपत्रिका गांवदेवीपेक्षां तिच्याच पायाशीं ठेवून तिला आशिर्वाद देण्याकरतां आमंत्रण करूं—

**नागेश** : बाळाचें बारसेंहि तिथंच करूं तर मग !

**सुंदर** : मग तर, फार फार आनंद होईल तिला.

**अरुणा** : बरं का ! बाळाचं नांव आनंदच ठेवायचं !

**पद्मा** : ( नागेशजवळचें बाळ घेऊन ) आनंद, ( पद्माकरास ) पाहिलांत का लबाड !

**पद्माकर** : काय रे आनंद ?

**पडदा पडतो**

**— समाप्त —**

# पुरवणी पदें

## अंक २ रा प्र. १ ला

**पद्माकर :** खऱ्या प्रेमाला भीतीचें वावडें असतें.

**पद् :** राग–देस–ताल–त्रिताल

**होय तुझें मज प्रेम अतुलबळ**
**ध्येय साधनीं तूंच सारथी ॥ धृ० ॥**
**होसि राजसे कां भयभीता**
**मदिय करिसी कां विव्हल चित्ता**
**कृत्रिम शंका निरसुनि आतां**
**हंसतचि देई नव आश्वासना ॥ १ ॥**



## अंक ३ रा प्र. १ ला

**पद्माकर :** ब्रह्मदेवाला जें आकलन करतां आलें नाहीं तें मला तरी कसं कळणार.

**पद् :** राग–सोहनी मिश्र, ताल–त्रिताल

**अति गुढ हृदय स्त्रीचें ॥ धृ० ॥**
**क्षणिक भावना, क्षणिक कल्पना**
**चलत्चित्र मनिचें ॥ १ ॥**
**क्षणांत रंगे क्षणांत भंगे**
**भाव तरल वरचे ॥ २ ॥**